

**Mr. F. D. Pudumjee,**
Ex. Managing Director of the DECCAN PAPER MILLS
Co., LTD., Mundhaw. ( Poona. )
Who has generously supplied the paper required for
this book as a donation.

एफ्. मॅक्समुलर,

( वेदार्थांचे प्रसिद्ध अभ्यासक व ग्रंथकार. )

जन्म ६-१२-१८२३ मृत्यु २९-१०-१९००



*From:*– "Picturesque Orientalia," by

डॉ. आर. एन्. सरदेसाई, व्यवस्थापक, ओरिएन्टल बुक एजन्सी,

१५, शुक्रवार पेठ, पुणें २. किं. १० रु.

ह्या पुस्तकांत १०३ पाश्चात्य संस्कृत पंडितांचे फोटो आहेत.

सुप्रसिद्ध आंग्लशिक्षित संस्कृत महापंडित

## डॉ. सर, रामकृष्ण गोपाळ भांडारकर



जन्म ता. ६ जुलै १८३७ ]　　　[ मृत्यु ता. २४ आगस्ट १९२५

( ऋषिपंचमी ८९ वर्षे आयुष्य.)

महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध संस्कृत पण्डित
**रंगाचार्य बालकृष्ण रड्डी**



जन्म शके १७९१
सेवानिवृत्तशास्त्री, डेक्कन कॉलेज, पुणें.

महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध संस्कृत महापंडित
महामहोपाध्याय **वासुदेवशास्त्री अभ्यंकर,**



जन्म सन १८६३
सेवानिवृत्तशास्त्री, फर्ग्युसन कॉलेज, पुणें.

प्रो. वि. पां. बोकील, एम्. ए. एस्. टी. सी. डी. माजी संस्कृत प्रोफेसर, सेकंडरी ट्रेनिंग कॉलेज, मुंबई, यांचे

## चार शब्द

प. ना. वा. तुंगार, यांच्या 'संस्कृतभांडारपरिचय' नावाच्या पुस्तकाबद्दल चार शब्द लिहिण्यात मला फार आनंद होत आहे. प्रथमतः संस्कृत भाषेबद्दल जसा मोठा आदर वाटतो तसाच तिचे आधारस्तंभ जे संस्कृत पंडित त्यांच्याबद्दलहि नेहमी मनात आदर असतो. ज्या महाराष्ट्रीयांना संस्कृत भाषा येत नाहीं त्यांना या भाषेतील साहित्याची कल्पना यावी म्हणून या पुस्तकाची रचना पं तुंगार यांनीं मोठी विचारपूर्वक केली आहे, असें दिसून येईल. म्हणजे संस्कृतभाषेचा प्रसार होईल असा प्रयत्न ग्रंथकर्त्यांनें केला आहे. तो निश्चित अभिनंदनीय व उत्साहजनक असून ग्रंथकर्त्यांच्या परिश्रमाची, विद्वत्तेची आणि चातुर्याची साक्ष देत आहे.

आर्यभाषा जी संस्कृत तिचे महत्त्व किती आहे तें आज नव्यानें सांगण्याची जरूरी नाही. जगामध्यें सर्वांत जुनी ही संस्कृत भाषा आहे. तिच्यातच आपले आद्य धर्मग्रंथ लिहिले गेले, हीच आपल्या जन्मभाषेची जननी, हिचें साहित्यभांडार अत्यंत सरोल व सर्वगामी, हिच्यातील तत्त्वज्ञानावरच्या ग्रंथानीं पृथ्वीच्या पाठीवरील सर्व विद्वानास आकर्षून घेतलेलें आहे, तद्वत् हिच्या साहित्याच्या सौंदर्यानें व गांभीर्यानें मोहित झालेले

शेकडो पंडित आजन्म हिचे सेवक बनलेले आहेत. अशा या संस्कृत भाषेचें महत्व अखिल हिंदूंना माहित आहेच. ही तिची महती ओळखून, विद्यार्थ्यांनीं व संस्कृतचा अभ्यास केलेल्या प्रौढ स्त्रीपुरुषांनीं नेहमी संस्कृत वाङ्मयाचा अभ्यास करण्यास सिद्ध व्हावें हाच ग्रंथकर्त्याचा मुख्य व स्तुत्य उद्देश आहे.

आजकालच्या व्यापारी व यांत्रिक जगांत या जुन्या भाषेच्या अभ्यासाचा काय उपयोग आहे असा प्रश्न कित्येक लोक विचारतात. त्यांना हें सांगणें जरूर आहे कीं, मानवी जीवनाचा व्यापाराशीं व शास्त्रीयसंशोधनाशीं जसा संबंध आहे तसा उदात्त वाङ्मयाशीं सुद्धां आहे. व्यवहारांत जसें द्रव्योत्पादन व भौतिक सुखसोयी लागतात, तसेंच उदात्त भावना, उदात्त विचार, उदात्त वृत्ति यांचीहि वैयक्तिक व सामाजिक कल्याणासाठीं जरूरी असते. उच्च प्रतीच्या वाङ्मयांत थोर विभूतींचे विचार ग्रथित झालेले असतात आणि त्यांच्या वाचनानें आबालवृद्धांच्या मनावर चांगला परिणाम होतो व नकळत त्यांचें शील उत्तम बनतें. म्हणून शीलसंवर्धनासाठीं संस्कृतसारख्या वाङ्मयाच्या अभ्यासाची मोठी आवश्यकता आहे.

कोणी म्हणतात कीं संस्कृत भाषा ही 'मृतभाषा' आहे, तर तिचें अध्ययन—अध्यापन आतां कशाला ? याला उत्तर असें आहे कीं संस्कृतभाषा ही मृतभाषा मानण्याचें कारण नाहीं. कारण या भाषेच्या द्वारें अजून आपले हिंदूंचे धर्मविधि चालतात आणि रोजची पूजादि नित्यकर्में होतात; प्रांताप्रांतांतील संस्कृत पंडित या भाषेंतच परस्परांशीं बोलतात व चर्चा करतात; आपल्या देशी भाषांच्या वाढीला याच भाषेचा मुख्यतः

उपयोग होतो; व्याकरण, न्याय, वैद्यक, ज्योतिष, तत्त्वज्ञान इत्यादि विषयांतील संशोधनास या भाषेतील वाङ्मय मार्गदर्शक ठरतें, असें असतां ही 'संस्कृतभाषा' मृत कशी मानावयाची? 'मृतभाषा' याचा *समासविग्रह 'मृतानां भाषा' असा जर केला तर तें कदाचित् जुळेल,* कारण राजकीयदृष्ट्या आपला समाज आजकाल मृतावस्थेंत आहे. पण ही संस्कृत भाषा मृत तर नव्हेच, उलट मृतसंजीवनी ('मृतान् अपि सञ्जीवयति इयं भाषा) असा विग्रह करून 'मृतभाषा' याचा अर्थ लावणेंच अन्वर्थक होईल. हल्ली या भाषेतील ग्रंथांचें प्रकाशन व संशोधन करणाऱ्या संस्था पाहिल्यास, तद्वत् नव्या-जुन्या पद्धतीच्या संस्कृत पंडितांचे या भाषेत झालेले व होणारे नवीन ग्रंथ, तसेंच तिच्यांतील विषयांवर अनेक भाषांतून झालेली व होणारीं भाषांतरें, हिंदुस्थानांतील हायस्कुलें, कॉलेजें, संस्कृत पाठशाळा, व जगांतील कांहीं देश यांतून चाललेलें संस्कृत भाषेचें अध्ययन-अध्यापन, संस्कृत मासिकें, या सर्व गोष्टींचा विचार करतां संस्कृतला 'मृतभाषा' हें नांव शोभतच नाहीं.

संस्कृत वाङ्मयांत आपल्या प्राचीन आर्य संस्कृतीचें चित्र हुबेहूब रेखाटलेलें दिसतें. तें नीट पाहून व त्याचा अर्थ बरोबर समजून घेऊन आजकालच्या व्यवहाराशीं त्याचा कसा काय संबंध घालावयाचा हें तरुण-पिढीनें शिकलें पाहिजे. त्या जुन्या संस्कृतीच्या पायावर नव्या समाजमंदिराची उभारणी केली पाहिजे. एकदम पाश्चात्य संस्कृतींत आपण एकजीव होऊं शकत नाहीं किंवा केवळ संपूर्ण जुन्या संस्कृतींतही निश्चल राहूं शकत नाहीं. या परिस्थितींत सुवर्णमध्य साधणें हेंच सर्व दृष्टीनें श्रेयस्कर होय, आणि त्यासाठीं संस्कृत वाङ्मयाचा अभ्यास अत्यंत आवश्यक ठरतो.

जागतिक प्रसिद्धीस पोहोंचलेल्या स्वामी विवेकानंद, लो. टिळक, महात्मा गांधी, सर सर्वपल्ली राधाकृष्णन्, पंडित मदनमोहन मालवीय, इत्यादि थोर विभूतींनी असाच बहुमोल उपदेश हिंदवाचीयांना अनेकदां केलेला आहे. पं. सुंगार यांच्याकडून ग्रंथनिर्मितीच्या रूपानें सरस्वती देवीची सेवा उत्तरोत्तर घडो अशी ईश्वरचरणीं प्रार्थना करतों.

वि. पां. चोकील,
डेक्कन जिमखाना, पुणें.

ता. १३-७-४२



## विद्वानांचे अभिप्राय

नाम्नैव एतत्पुस्तकं स्वीयं विषयमवगमयत्येव प्रियपाठकेभ्यः। पण्डित तुंगारमहाभागाः पुस्तकमिदं लिखित्वा प्रकाश्य च महूपाकुर्वन् संस्कृतभाषा-रहस्यजिज्ञासून्, इति समभिनन्दामो वयं महाभागान्। संस्कृतभाषाप्रवेशं चिकीर्षुभिः विद्यार्थिभिः प्रथमत एव इदं पुस्तकं वाचनीयम्। यतो भाषा-परिचयो नाम न केवलं भाषायां समवेतानां नामाख्यातोपसर्गनिपातानां तत्तद्रूपेण व्याप्यरूपेण च परिचयः।-

> प्रकृत्यैव तु या भाषा प्राकृतेत्यभिधीयते।
> संस्कारेण युता सैव संस्कृतेत्यभिधीयते॥ १॥

न कोऽपि तादृशो विषयः यो वेदेन न संसूचितः। वेदस्यानन्तत्वं च वेद एव वेत्ति। तथा च स्वयमेव श्रुतिः तस्याः पारं न वेत्ति किमुतान्येन पारो वेदनीयः, तथापि आचार्यपदवीं समारूढाः पाणिनिप्रभृतयः महर्षयो ये अभूवन् तैः श्रुतिपारो ज्ञात एव आसीत् अन्यथा कथं 'नित्यं छन्दसि। (पाणिनीसूत्र ७-४-८) इति सूत्रितं स्यात्। अत्र च पुस्तके रचना-चातुरी निरतिशयमनोहरा युक्तियुक्ता च वर्तते। तथा च, संस्कृतभाषायां के के ग्रन्थाः, तत्र च के के विषयाः प्रतिपादिताः, कथं च तेषां विषयाणां बोधः सम्पादनीयः, कश्च विषयः, केनासौ, सामान्येण लिखितः, तत्सर्वमत्र सचित्रितं तुंगारमहाभागैः। अतः संस्कृतभाषां पठितुकामाः विद्यार्थिनः, जिज्ञासवो विद्वद्वराः तथा सर्वत्र संस्कृतभाषामध्यापयितुकामाश्चापि इमं 'संस्कृतभाण्डारपरिचयम्' उपयोक्ष्यन्ते उपयोज्य च कृतकृत्याश्च निःसंशयं

*भविष्यन्ति। आशास्महे सर्वत्र पुस्तकमेतत्पुरस्कारं समतामिति शम्।

मिति आषाढ शु. २ शके १८६४ १५-७-४२,

१ महामहोपाध्याय वासुदेवशास्त्री अभ्यंकर सेवानिवृत्त 'शास्त्री' फर्ग्युसन कॉलेज, पुणें.

२ विद्याभूषण रंगाचार्य रड्डी सेवानिवृत्त 'शास्त्री' डेक्कन कॉलेज, पुणें.

३ पुरुषोत्तमशास्त्री रानडे 'शास्त्री' आनंदाश्रम, पुणें.

४ व्याकरणकोविद गणेशशास्त्री झेंडये अध्यापक, संस्कृतपाठशाळा, पुणें.

---

संस्कृतभाषेंत अत्यंत महत्त्वपूर्ण असें वाङ्मय आहे. त्याचें ज्ञान अनेक दृष्टींनीं समाजाला उपयुक्त होणार आहे, परंतु तें उपयुक्त कसें आहे हें दाख विण्याचीं साधनें मराठींत फारशीं उपलब्ध नव्हतीं. ही उणीव श्री. तुंगारमास्तर यांच्या 'संस्कृतभाण्डारपरिचय' या सुंदर पुस्तकानें भरून काढली आहे. हें पुस्तक विद्यार्थ्यांना तर उपयोगी आहेच, पण संस्कृताचा अभ्यास केलेल्या प्रौढ स्त्री-पुरुषांना देखील पुढें संस्कृतचा व्यासंग कायम ठेऊन आपल्या ज्ञानांत नवीन उत्तेजक ज्ञानाची भर घालावी अशी आवड उत्पन्न करण्यालाही निश्चित उपयोगी होईल, असा मला विश्वास वाटतो, म्हणून आबाल वृद्धांनीं ह्या पुस्तकाचा अवश्य फायदा घ्यावा.

| मिति आषाढ शु॥ २, शके १८६४ ता. १५-७-४२ | नरहर गोपाळ सरदेसाई एम्. एम्., ॲण्ड एस्. माफक, ओरिएन्टल बुक एजन्सी, १५ शुक्रवारपेठ, पुणें २. |
|---|---|

| | |
|---|---|
| श्री. शंकरराव आडकर, रिटायर्ड नाझर, पुणें, | १० |
| प्रि. ज. र. घारपुरे, लॉ कॉलेज, पुणें, | १० |
| सरदार जी. के. फाळे, पुणें, | १० |
| रावसाहेब के. एस्. कुमठेकर, बी. ए. एल्. एल्. बी. पुणें, | १० |
| श्री. मोरेश्वर वामन फडके, बंगलोर, | १० |
| श्री. द. श्री. ऊर्फ वसंतराव गदगकर, पुणें, ( वडील कै. श्री. दं. ऊर्फ बापूसाहेब गदगकर यांचे स्मरणार्थ ) | १० |
| श्री. केशवराव वामनराव चिपळूणकर, पुणें, | १० |
| रावसाहेब गो. म. ऊर्फ अण्णासाहेब वैद्य, पुणें, | ५ |
| श्री. का. श्री. गोरे, पुणें, | ५ |
| श्री. नानासाहेब रबडे, पुणें, | ५ |
| श्री. मुरलीधर शेठ कोहिमा पुणें, | ५ |
| सरदार घं. कृ. फुलंब्रीकर, पुणें, | ५ |
| श्री. सीताराम गोविंद ऊर्फ अण्णासाहेब तांबोळी पुणें ( वडील कै. गोविंदराव अंताजी तांबोळी नाईक ) पुणें, यांच्या स्मरणार्थ. | ५ |

वरील सद्गृहस्थांनीं देणगी दिली म्हणूनच हें पुस्तक मला छापतां आलें; याबद्दल जनतारूपी जनार्दनाचे उपकारस्मरण नेहमी ठेवणें हें माझें आद्य कर्तव्य होय.



येत नाहीं. तद्वत् हायस्कूल, संस्कृतपाठशाळा यांमध्यें आरंभीं विद्यार्थ्यांना संस्कृत भांडाराचा परिचय करून दिला जात नाहीं. त्यामुळें संस्कृत भाषेविषयीं त्यांच्या मनांत परीक्षेंत पास होण्यापलीकडे ध्येय राहत नाहीं. ही स्थिति बदलून विद्यार्थ्यांची व इतर संस्कृतप्रेमी प्रौढ-स्त्रीपुरुषांची व्यापक दृष्टि बनावी आणि पुढें त्यांनीं संस्कृतांतील न वाचलेल्या ग्रंथांच्या वाचनाकडे वळावें म्हणून मी माझ्या गेल्या चव्वाल वर्षांचा संस्कृत अध्यापनाचा अनुभव जमेस धरून 'संस्कृत भाण्डारपरिचय' नांवाचें पुस्तक वाचकांचे हातीं देत आहे.

शिक्षणाचें ध्येय—१ विद्यार्थ्यांच्या बुद्धीची चांगली वाढ होऊन त्याचें शरीर, मन, सुदृढ होणें. २ जन्मप्राप्त देणग्यांचा योग्य मार्गानें जास्तीत जास्त विकास करणें. ३ विद्यार्थ्याला आपलें पुढील आयुष्य समाजांत ( सुखदुःख संमिश्ररूपी संसारांत ) राहून काढावयाचें आहे; त्याला समाजाच्या उपयोगी पडावयाचें व समाजापासून आपला फायदा करून घ्यावयाचा आहे. तो राष्ट्राचा एक उत्तम नागरिक बनला पाहिजे. विद्यार्थ्यांच्या मनांत ज्ञानलालसा, वाचन, नवीन चांगली गोष्ट शिकणें, हीं ध्येयें साधण्यास ह्या पुस्तकाच्या वाचनानें मदत होईल.

तद्वत् सनातन वैदिक धर्म व संस्कृती यांच्या ज्ञानाबरोबर निवंत भाषा, स्फूर्तिदायक विचार, यांचा विद्यार्थ्यांना व इतर संस्कृतप्रेमी प्रौढस्त्रीपुरुषांना परिचय होण्यास साहाय्य होईल आणि आपल्या पूर्वजांच्या ध्येयभूत आचार-विचारांचें ज्ञान, त्यांचा विकास कसा होत गेला, हेंहि उत्तमरीत्या कळण्यास मदत होईल.

## ' संस्कृतवाङ्मयाची थोडी कल्पना '

भाषामाहात्म्य— भाषेमुळें माणसाच्या उन्नतीला मदत झाली आहे. भाषेच्या योगानें एकमेकांचे विचार एकमेकांना समजण्याला व त्यामुळें ज्ञानाच्या वाढीला उत्तम साहाय्य झालेलें आहे. मनुष्य हा बुद्धीच्या बळ-

सीत इतरांच्या ( पशु-पक्षी किडे ) पेक्षां जरी उच्च प्रतीचा असला तरी त्याची बुद्धि व्यक्त होण्याचें जें साधन भाषा त्यामुळेंच त्याला महत्व प्राप्त झालेलें आहे. भाषेच्या या उपयुक्ततेमुळें साहित्यशास्त्राचा जन्म झाला. व निरनिराळ्या साहित्यांनीं अज्ञानी लोकांना ज्ञानी करून लोकसंग्रहाचें स्तुत्य भरीव असें कार्य केलेलें आहे. जेव्हां जेव्हां देश, धर्म, समाज, यांची विस्कळीत व डळमळीत अशी स्थिति होते, तेव्हां तेव्हां ती स्थिति चांगली सुधारण्यासाठीं त्या काळाला सर्वस्वीं योग्य असें वाङ्मय प्रसृत करून त्याच्यामुळें बहुजनसमाजाच्या उद्धाराचें कार्य करावें लागतें. या दृष्टीनें संस्कृतभाषेची मूल प्रकृति व तिच्या निरनिराळ्या शाखांपासून सर्व तऱ्हेची ऐश्वर्यें उत्पन्न करून हिंदूंनीं मोठमोठाल्या साम्राज्यें स्थापून एकंदर पुष्कळच प्रगति केली होती व आधिभौतिक ज्ञानही मिळविलें होतें. त्यांचा विचार करण्याचें योजिलें आहे.

'Wilson Philological Lectures' मध्यें 'प्राकृत भाषा या संस्कृतोद्भव होत' असें प्रतिपादन केलें पण 'संस्कृत' या शब्दाचा स्पष्ट अर्थ त्यावेळीं केला गेला नव्हता. आतां भाषाशास्त्रांतील अद्ययावत् शोधानुसार असें विद्वानांनीं ठरविलें आहे कीं, ऋग्वेदकालीं मात्र संस्कृत विद्वानांमध्यें प्रचलित असतांना त्यावेळीं जी भाषा ( मग तिला संस्कृत प्राकृत किंवा दुसरें कोणतेंही नांव द्या ) सामान्य जनांत प्रचलित होती तिच्यापासून हळींच्या प्राकृतांची वंशावळ सुरू होते. माझ्यामतें संस्कृत व प्राकृत ह्या दोन्हीं भाषा अगदीं आरंभापासून होत्या. हें खालील दोन उदाहरणावरून समजेल. एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं—

(१) प्रत्यक्ष देवांनीं आपल्या वेळीं संस्कृत व प्राकृत या भाषांतून व्यवहार चालविला होता, याचें उदाहरण—

> द्विधाप्रयुक्तेन च वाङ्मयेन सरस्वती तन्मिथुनं नुनाव ।
> संस्कारपूतेन वरं वरेण्यं वधूं सुखग्राह्यनिबन्धनेन ॥

कुमारसंभवकाव्य ( कालिदासकृत ) सर्ग ७ श्लोक ९०. मल्लिनाथटीका—अथ सरस्वती वाग्देवी, द्विधा संस्कृत-प्राकृत-रूपेण, प्रयुक्तेन उच्चारितेन, वाङ्मयेन शब्दजालेन तन्मिथुनं नुनाव तुष्टाव । संस्कारेण व्याकरणव्युत्पत्त्या, पूतेन प्रकृतिप्रत्ययविभागशुद्धेन संस्कृतेन इत्यर्थः । वरेण्यं श्लाघ्यं, वरं ( शिवम् ) नुनाव । सुखेन ग्राह्यं सुबोधं निबन्धनं रचना यस्य तेन वाङ्मयेन प्राकृतभाषया इत्यर्थः । वधूं पार्वतीं नुनाव ।

तात्पर्यार्थः— सरस्वतीनें संस्कृत व प्राकृत या दोन भाषांच्या द्वारें त्या जोडप्याची स्तुति केली. संस्कृतभाषेंतून शंकराची स्तुति केली व प्राकृत भाषेंतून पार्वतीची स्तुति केली.

वैदिक वाङ्मय—यांत उत्तम आरोग्य; पुष्कळ आयुष्य, सामर्थ्य, पराक्रम, विजय मिळविणें, शत्रूचा नाश करणें, कीर्ति मिळविणें, कवित्व व विद्वत्ता अंगीं येणें, आनंद मिळणें, राष्ट्राची उन्नति होणें, गाई, बैल,

घोडे, पशु, धन-धान्य, चांगली बायको, चांगला मुलगा, चांगली मुलगी, यांची प्राप्ति होणें, वगैरेंचा आपल्याला या जगांतच लाभ व्हावा अशा प्रार्थना व इच्छा ठिकठिकाणीं दिसतात. यावरून हल्लींच्या परिस्थितींतून समाजाला उन्नतीचा मार्ग दाखविणारें वैदिक वाङ्मय आहे यांत संशय नाहीं.

महाकाव्य—( १ ) हिंदुस्थानची नीति व उपदेश यांचा मूर्तिमंत पाया असलेलें ( २ ) जीवनक्रम सद्गुण यांचा एकेठिकाणीं सांठा असलेलें ( ३ ) उत्कृष्ट संस्कृती कशी असावी हे दाखविणारें रामायण व महाभारत हे दोन विश्वकोश आहेत.

रामायण—( १ ) रामायण हें सर्व ठिकाणीं आद्यकाव्य म्हणून समजलें जातें. ( २ ) राम व सीता यांची चरित्रें हिंदुस्थानांत अत्यंत आदरणीय मानलीं जातात. ( ३ ) जीवनांत कर्तव्य, अधिकार हीं प्रमुख होत. कर्तव्यांत सेवा ही मुख्य असते. अधिकारात प्रभुता व शासन हीं असतात. मनुष्य नेहमीच्या प्रसंगांत आपलें मुख्य कर्तव्य विसरतो आणि फक्त आपला अधिकार तेवढाच गाजवीत असतो. जो जीवनांत कर्तव्य व अधिकार, यांचा सदुपयोग करतो तो आदर्शपुरुष ठरतो. या दृष्टीनें पाहतां आदर्शपुत्र, आदर्शपति, आदर्शवीर, आदर्शप्रजापालक, आदर्श कर्तव्यनिष्ठ, असा राम आहे हें रामायणावरून समजतें.

**रामायणांतील कथा व त्यांच्यापासून घेण्याजोगा बोध.**

| कथा | बोध |
|---|---|
| १ वामनाची कथा— | १ स्वराज्याची श्रेष्ठता. |
| २ समुद्रमंथन कथा— | २ संघटनेनें कार्य करून फायद्याच्या वाटणीच्या वेळीं एकमेकांत भांडूं नये. |
| ३ विश्वामित्र कथा— | ३ एक ध्येय पुढें ठेऊन उन्नति करून घेतली. ऋषि, महर्षि, राजर्षि, ब्रह्मर्षि. |

| | |
|---|---|
| ४ विश्वामित्र–मेनका कथा— | ४ काम विकारापासून आपलें रक्षण करावें. |
| ५ परशुराम कथा— | ५ ( १ ) आपल्या स्वाभिमानाला कोणीहि डिवचलें असतां आपलें शक्ति-सर्वस्व त्याकरितां खर्च करून त्याचें पूर्ण निर्मूलन करणें. (२) कसल्याही प्रसंगीं वडील माणसांची आज्ञा अमान्य न करणें. |

तात्पर्य—वरील कथा सांगण्याचा हेतु त्यावेळीं समाजांत जे दुर्गुण उत्पन्न झाले होते, त्यांपासून राम–लक्ष्मण, वगैरेंना अलिप्त ठेवावें आणि तरुण पिढींत चांगले गुण वाढून त्यांच्या अंगीं राष्ट्रकार्य करण्याची योग्यता यावी हा होता. या दृष्टीनेंच वाचकांनीं कथांच्याकडे पहावें.

अस्त्रविद्या—रामानें ताटकेच्या वधानें राक्षसवधरूपी कार्यास सुरुवात केलेली पाहून समाधान पावलेल्या देवांनीं विश्वामित्राला असें सांगितलें कीं—तुझ्याजवळची अमोघ अस्त्रें तूं रामाला द्यावीस व त्याला राक्षसांच्या वधाला योग्य सामर्थ्यवान बनवावें. नंतर राम लक्ष्मण विश्वामित्रांच्याकडे आले तेव्हां त्यांनीं त्यांना अस्त्रें देऊन हुषार केलें. कांहीं अस्त्रें चालू युद्धांत दिसतात. १ शूल्यदस्त्र– (Bomb) ज्यामधून सुळे, तीक्ष्णकांटे, शत्रूच्या अंगावर फेकले जातात असें अस्त्र. २ ऐषिकास्त्र–ज्याच्या टोकाला कुंचल्या-सारखे, सुयासारखे बारीक खिळे बसविलेले असतात असें अस्त्र. आकार–बाणासारखा. ३ आग्नेयास्त्र—अग्नीचा वर्षाव करणारें अस्त्र. [ आगलावे बाँब– (Incendiary bombs.) ४ मोहनास्त्र—ज्यानें शत्रूचें सैन्य गुंगून जातें. त्यास काय करावें, काय करूं नये, तें समजत नाहीं असें अस्त्र. ५ प्रस्वापनास्त्र— झोप आणणारें अस्त्र, ( Sleeping gas ) ६ संतापनास्त्र– दाह उत्पन्न करणारें अस्त्र. (Producing burning heat ) ७ विलापनास्त्र— रडवणारे अस्त्र. ( अश्रुवायु Tear gas ).

८-यादनास्त्र— भुंदी येणारें अस्त्र. ९ तामसास्त्र— अंधार पाडणारें अस्त्र. १० सौरास्त्र— (तेजःप्रभास्त्र)—प्रकाश पाडणारें किंवा शत्रूचे डोळे दिपवणारें अस्त्र.

महाभारत—(१) सद्गुणांचा विजय, दुर्गुणांचा पाडाव, हें यांतील मुख्य रहस्य आहे. (२) नेहमीच्या व्यवहारांत सुखदुःखाचे, संकटांचे वारंवार जे जे प्रसंग येतात, त्या सर्वांचें यथार्थ वर्णन महाभारतांत असून त्यावेळीं माणसानें आपलें वर्तन कसें ठेवलें असतां त्याचें कल्याण होतें; अशा प्रसंगीं आपले पूर्वज कोणतें धोरण ठेवीत आले; आपला धर्म कोणता नीति कोणती व दोहोंचा व्यवहारांत तारतम्यानें उपयोग कसा करावा वगैरे मनोरंजक उदाहरणांच्या रूपानें सोडविलेलें आहे.

३ सदुपदेश व पुत्रस्नेह यांच्या द्वंद्वांत सापडलेला आंधळा-वृद्ध असा धृतराष्ट्र, धीर पुरुषास योग्य अशा वागतीचे भीष्माचार्य, उदार व महात्मा असा राजा युधिष्ठिर व त्याचे शूर, एकनिष्ठ असे भीम, अर्जुन, नकुल, सहदेव हे सर्व भाऊ व लोकांचे मतभेद नाहीसे करून त्यांचे ऐक्य घडवून आणून त्यांची उन्नति करण्याकरितां झटणारा महाज्ञानी असा भगवान श्रीकृष्ण, पतिनिष्ठ राणी गांधारी, वात्सल्ययुक्त कुंती, पतिसेवापरायण व निरनिराळ्या प्रकारच्या संकटांस न भिणारी अशी द्रौपदी, - इत्यादि बोध घेण्यासारख्या व्यक्ति आहेत.

दुर्योधनाच्या मनाचा नीच भाव 'सज्जनलोकांना अन्यायानें छळून दुर्जनांचें समाधान होत नाहीं. सज्जन लोक दुःखांत असतां आपलें ऐश्वर्य त्यांना वारंवार दाखवून त्यांना हिणविण्यांतच दुर्जनांना समाधान वाटतें' सर्व वैभव नाहींसें होऊन अरण्यांत द्रौपदीसह वल्कलें नेसून राहिलेल्या पांडवांना आपलें ऐश्वर्य दाखवून लाजवावें व त्यांना दुःखी करावें या मनांतल्या हेतूनें व द्वैतवनांतल्या कौरवांचे घोष (खिल्लारखाने) पाहण्याच्या आणि मृगया करण्याच्या निमित्तानें दुर्योधन आपलें सैन्य, भाऊ, स्त्रिया, यांच्यासह द्वैत-

वनांत आला. अगोदर खिल्लारखान्यांत जाऊन तेथील गाई, बैल, वासरें, वगैरे पाहिलीं. नंतर सगळ्यांनीं मृगया केली. शेवटी पांडवांच्या वसतिगृहा-जवळील सरोवरांत जलक्रीडा करण्याचा दुर्योधनानें बेत केला, व आपले सेवक तिकडे पाठविले; त्यावेळी तेथें चित्रसेन गंधर्व अप्सरांसह जलक्रीडा करीत होता; म्हणून इतर गंधर्वांनीं कौरवांच्या सेवकांना परत जाण्यास सांगितलें. दुर्योधनाचा अपमान झालेला पाहून कौरवांनीं गंधर्वांशीं युद्ध सुरू केलें. शेवटीं चित्रसेन गंधर्वानें कौरवांचा पराभव करून त्यांना व त्यांच्या बायकांना कैद करून घेऊन जयघोष करीत जाऊं लागला. इकडे पळून गेलेले कौरवांचे प्रधान धर्मराजाला शरण आले; आणि दुर्यो-धनाला व कौरवांच्या स्त्रियांना मुक्त करून कुरुवंशाची लाज राखा, अशी प्रार्थना केली. भीमानें ही बातमी ऐकून असे उद्गार काढले कीं—आम्ही क्षत्रिय असूनही आज येथें वनांत स्वस्थ पडलो असतां, तिन्हाईत माणसानें आमच्या शत्रूंचा पराभव करून आमची लाज राखली. शत्रूंचा पराभव करावयास आम्हाला मोठें सैन्य तयार करून युद्ध करावें लागलें असतें, तें परस्पर तिन्हाईत माणसानेंच केलें, हें चांगलें झालें. हें भीमाचें बोलणें धर्मराजाला पसंत पडलें नाहीं.

धर्मराजाच्या मनाची थोरवी—'हे लोक आपल्याला शरण आले आहेत, तेव्हां त्यांचें रक्षण करणें हें आपलें कर्तव्य आहे. कुरुवंशांतील स्त्रियांना गंधर्वांनीं कैद करून घेऊन जावें आणि आपण स्वस्थ बसावें हें तर योग्य नाहींच, उलट लांछनास्पदच आहे. एकमेकांत भांडण असेल तेव्हां ते शंभर ( कौरव ) आणि आपण ( पांडव ) पांच आहोत, परंतु तिन्हाइताशीं तंटा असेल तेव्हां आपण एकशेंपाच झालें पाहिजे.

ते शतं हि वयं पञ्च परस्परविवादने ।
परैस्तु विग्रहे प्राप्ते वयं पञ्चाधिकं शतम् ॥

असा उपदेश करून दुर्योधनादिकांना गंधर्वांच्या पासून सोडवून आणण्या करितां भीम वगैरेंना पाठविले. त्यांनीं चित्रसेन गंधर्वांबरोबर युद्ध करून कौरवांना बंधमुक्त केलें. पांडवांना हिणविण्यासाठीं आलेल्या आम्हाला पांडवांच्या समोर दुसऱ्यांचे कैदी म्हणून उभे राहावें लागलें आणि त्यांच्या-मुळें सुटका झाली; आपल्या बायकांच्या देखत हा प्रसंग आलेला पाहून दुर्यो-धनाला फार वाईट वाटलें.

तत्त्वज्ञान—जगांतील इतर लोकांपेक्षां आर्यांची विशेष गोष्ट म्हणजे तत्त्वज्ञान. महाभारतांत तत्त्वज्ञानाचा बराच मोठा भाग आहे. सर्व प्राणि-मात्रांचे ठिकाणी आत्मौपम्यभावानें पाहणें हेंच श्रेष्ठ प्रतीचें स्वराज्य आहे; (- सर्वभूतस्थमात्मानम् सम्पश्यन्नात्मभूतानि स्वराज्यमधिगच्छति ।) आपली ध्येयें व आपलें तत्त्वज्ञान उत्कृष्ट आहे. ( परंतु अलीकडे जीवनाशीं मेळ घालतां न आल्यानें आपण मागें पडत आहोत. यांत तत्त्वज्ञानाचा दोष नाहीं.) उदा–भगवद्गीता, शांतिपर्वांतील मोक्षधर्म, उद्योगपर्वांतील सन-त्सुजातीय, वनपर्वांतील धर्मव्याधसंवाद. वगैरे तत्त्वज्ञानाची माहिती करून देणारीं आहेत.

प्रवृत्ति व निवृत्ति—देशाची सामाजिक, नैतिक, धार्मिक, उन्नति होण्यास त्या देशांतील लोकांत प्रवृत्ति व निवृत्ति यांचें योग्य सेवन व्हावयास पाहिजे. प्रवृत्तीच्या अत्यंत आधीन होऊन विषयसुखाच्या पाठीमागें लागलेला समाज किंवा व्यक्ति अवनतीस जाते, अथवा उलट निरिच्छ, निराश राहणें यानेंही अवनति होते.

प्रवृत्तीचें प्राबल्य—लोभामुळें कंस, जरासंध, दुर्योधन, यांनीं त्यावेळीं समाजाची हानि केली. जरासंधानें हजारो क्षत्रिय मारले. दुर्योधनानें द्यूतांत पांडवांना हरवलें. तेव्हांपासून युद्धाला सुरुवात झाली. या वेळीं भगवान् श्रीकृष्णानें भगवद्गीतेच्या द्वारें 'निर्लोभवृत्तीचा' अर्जुनास उद्देशून उपदेश केला.

लोभ—प्रवृत्तीच्या अतिरेकाचा परिणाम लोभ आहे. लोभाच्या अतिरेकानें सर्वस्वी नुकसान होतें. व्यासांनीं एके ठिकाणीं सांगितलें आहे कीं—या पृथ्वीवर जेवढें म्हणून धन-धान्य, पशु, स्त्रिया आहेत तेवढ्या एका माणसाला जरी मिळाल्या तरी त्याचें पुरेसें समाधान होणार नाहीं. हें जाणून माणसानें 'शमप्रधान' वृत्तीनें राहिले पाहिजे.—

यत्पृथिव्यां व्रीहियवं हिरण्यं पशवः स्त्रियः।
नालमेकस्य तत्सर्वमिति मत्वा शमं भजेत् ॥

तात्पर्य—लोभाचें प्राबल्य वाढूं लागलें म्हणजे कपट, जुलुम, द्वेष, निंदा, या दुर्गुणांचें प्राबल्य समाजांत-राष्ट्रांत सुरू होतें व त्याचा शेवट वैरांत होऊन तो समाज किंवा तें राष्ट्र लयाला जातें. म्हणून लोभ वाईट.

धर्म—संस्कृत वाङ्मयांतील निरनिराळीं धर्माचीं लक्षणें पाहिल्यास 'धर्म' हा सत्य व प्रेम यांच्यावर आधारलेला आहे. धर्मांत मनुष्यमात्राचा विचार मुख्यतः केला आहे. 'स्वतःची ( बायको-मुलें, आई-बाप, भाऊ, बहिणी, इतर नातेवाईक, मित्र, वगैरे ) व बहुजन समाजाची शारीरिक, बौद्धिक, आत्मिक, उन्नति करणें हा धर्माचा उद्देश आहे.'

धर्मप्रचारकांचें कार्य— पूर्ण अज्ञानी, अर्धवटज्ञानी, अशा लोकांच्या वेडगळ वागण्यानें व अविचारानें समाजांत अस्वस्थता उत्पन्न होते, ती नाहिशी करून पुनः तेथें धर्माच्या उद्देशाच्या दृष्टीनें चांगली स्थिति निर्माण करणाऱ्या साधुसंतांची, व पुढाऱ्यांची मोठी परंपरा आहे. हें आम्हां हिंदूंचें वैशिष्ट्य आहे. ( परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् । गीता ) वेदकालापासून तें भगवान् गौतमबुद्धापर्यंत नंतर शंकराचार्यादि आचार्य, रामदास, ज्ञानेश्वर तुकारामादि साधुसंत, रामकृष्ण परमहंस, विवेकानंद, दयानंद, श्रद्धानंद, शिवाजी, लोकमान्य, गुरुनानक, महात्मा गांधी, बॅ. सावरकर वगैरे पर्यंतच्या अनेक श्रेष्ठ व्यक्ती धर्मप्रसाराचें व बहुजनसमाजोद्धाराचें कार्य अव्याहतपणें करीत आले आहेत.

व्याकरण—संस्कृत व्याकरणशास्त्राचा अभ्यास जितक्या कळकळीनें व पूर्णपणानें झालेला आहे तसा कोठेंही झालेला नाही. आजपर्यंत झालेले व चालू असलेले व्याकरणाचे संप्रदाय १२ आहेत. एकूण व्याकरण-ग्रंथकार ३०० आहेत. पाणिनीसारखा वैय्याकरणी पुढें झाला नाही. सदर अष्टाध्यायीइतका अलौकिक व्याकरणग्रंथ झाला नाहीं. प्राचीनांनीं संस्कृत भाषेचें व्याकरण म्हणजे वाक्यपृथकरण आणि शब्दपृथकरण केलें, वर्णांच्या उत्पत्तीचे नियम शोधून काढले. प्रत्येक संबंधोत्पादक शब्दांचा सूक्ष्म अर्थ सांगितला. भाषा व उपभाषा यांतील संबंध व फरक नोंदविले. भाषेतील सर्व शब्दांचा संग्रह करण्याचा प्रयत्न केला. ( ज्ञानकोश, प्रस्तावनाखंड ).

काव्य—संस्कृतसाहित्यकारांनीं काव्याचा फार विचार केला आहे. 'काव्य' या शब्दाचा अर्थ कवीचें कार्य असा आहे.

विषय—( १ ) शहरें, समुद्र, पर्वत, ऋतु, चंद्र, सूर्य, वगैरेंचें सविस्तर, अलंकारिक, रसयुक्त, सुंदर वर्णन, हे काव्यांत मुख्यतः असलें पाहिजे.

नगरार्णवशैलर्तुचन्द्रसूर्यादि वर्णनैः ।
अलङ्कृतमसंक्षिप्तं रसभावनिरन्तरम् ।

( २ ) काव्याच्या वाचनानें व श्रवणानें उदात्त कल्पना, उत्कृष्ट विचार, श्रेष्ठ मनोवृत्ति, करमणूक, यांचा उत्तम परिपोष होऊन ऐकणारांची मनें आनंदानें भरून जावें ही स्थिति काव्याची असावी लागते. या दृष्टीनें रामायण, महाभारत, रघुवंशादि काव्यांचा अभ्यास केलेल्या व करणाऱ्या लोकांना काव्याची उपयुक्तता सहज पटेल.

संगीत—साहित्यसंगीतकलाविहीनः साक्षात् पशुः पुच्छविषाणहीनः । निरनिराळ्या कलामध्ये ( ६४ ) जगांत संगीताचा श्रेष्ठ दर्जा आहे. संगीतांत गायन, वादन, नृत्य वगैरेंचा समावेश होतो. स्वतःस आनंद होऊन दुसऱ्यांना आनंदी करणें हें संगीतशास्त्राचें कार्य आहे. मध्यंतरी म्हणजे गेल्या

४०वर्षांत संस्कृति, शिक्षण, सामाजिक दर्जा, यांनीं कमी प्रतीच्या व व्यसनी लोकांच्या आधीन 'संगीतशास्त्र' असल्यानें संगीताला किंचित् कमीपणा आला होता, ही स्थिति सोडल्यास वेदकालापासून तें हलीच्या कालापर्यंत पुढील संगीतज्ञांनीं संगीताची उन्नती केली.

| नांव | संस्कृतग्रंथ |
|---|---|
| दत्तिल | दत्तिल |
| मतंग | बृहत् देशी |
| पार्श्वदेव | संगीतसमयसार |
| चतुरकल्लिनाथ | संगीतरत्नाकर |
| रामामात्य ( विजयानगर ) | स्वरमेलकलानिधि |
| अहोबल | संगीतपारिजात |
| सोमनाथ | रागबोध |
| पं. दामोदर | संगीतदर्पण—रत्नाकर, |
| तुळाजीराव भोसले ( तंजावरचे महाराज ) | संगीतसारामृतोद्धार |
| कै. वि. ना. भातखंडे, बी. ए. एल्. एल्. बी. | अभिनवरागमञ्जरी |

ज्योतिष—आपल्या प्राचीन लोकांचें ज्योतिषाचें ज्ञान पूर्णावस्थेस गेलें होतें. १२ व्या शतकांत झालेल्या भास्कराचार्यांना नंतर कित्येक शतकांनीं न्यूटननें शोधून काढलेला गुरुत्वाकर्षणाचा नियम माहीत होता.

वैद्यक—वैद्यकांतील ज्ञानसंशोधन अत्यंत मार्मिक आणि खोल कोटी-पर्यंत पोहोंचलेलें असें आहे.

'धन्वंतरि' हा वैद्यकाचा आद्यसंशोधक होय. संस्कृत भाषेंतील वैद्यकाचें ज्ञान हिंदुस्थानांतून बगदादला व तेथून अरबस्थानांत, थोडें

ग्रीस देशांत, नंतर तेथून पश्चिम युरोपांत या पद्धतीनें पसरत गेलें आहे. बगदादच्या खलिफानें ९५०–९६० मध्यें संस्कृतवैद्यकग्रंथांचीं भाषांतरें करविलीं. अलेक्झांडरच्या दरबारामध्यें आपल्या इकडच्या वैद्यांची 'सर्पदंश बरे करणारे' म्हणून प्रसिद्धि होती.

शस्त्रक्रिया—शस्त्रविद्येंत आमची प्रगति विशेष होती. पोत्यावर मेण चोपडून त्यावर अथवा वनस्पति किंवा मेलेला प्राणी यांवर शिक्षण दिलें जात असे. अवयव कापणें, रक्त बंद करणें, गर्भाशयांमधून बाहेर गर्भ काढणें, गर्भाशयावर शस्त्रक्रिया करणें, मुतखडा काढणें, नेत्रबिंदु काढणें, निखळलेलीं किंवा मोडलेलीं हाडें बसविणें वगैरे कामें वैद्यलोक करीत होते. हिमालय, सह्याद्रि यामधील निरनिराळ्या उपयुक्त वनस्पतींचे गुणधर्म जाणून घेऊन संशोधक पाश्चात्य डॉक्टरांनीं युरोपांत व अमेरिकेंत त्या नेऊन त्यांच्या तेथें बागा केल्या आहेत. नंतर त्या वनस्पतींचीं औषधें बनवून आमच्याकडे पाठविण्यांत येत आहेत. आपल्या संशोधकांना पूर्वीच्या वैद्यक ग्रंथांचें महत्व कळूं लागलें आहे व आधुनिक पद्धतीनें ते वैद्यकांत सांगितलेल्या औषधींच्या गुणधर्मांचें परीक्षण, संशोधन, करण्याकडे प्रवृत्त झालेले आहेत. त्या कामांत जो अनुभव येत आहे, त्यावरून 'वैद्यक' म्हणजे अनुभव आणि संशोधन यावर रचलेलें शास्त्र आहे. ( विज्ञानबोध, संपादक–प्रो. मारे. या ग्रंथाधारें ).

शिल्पशास्त्र—नाशिक, वाई, काशी, रामेश्वर, द्वारका, वगैरे ठिकाणचीं, दगडी जुनीं देवळें, त्यांतील गाभारे, सभामंडप, नंदी, पिंडी, खांब व त्यावरील निरनिराळीं चित्रें, डोंगरांतील लेण्यां, बुद्धांचे विहार, स्तूप, घुमारे, धर्मशाळा, जुनेवाडे, हौद, वगैरे त्या काळांतील कुशल पाथरवटांचीं कसलीही चूक नसलेलीं अशीं कामें पाहिल्यावर आमचे पूर्वज हल्लीच्या इंजीनियरिंगच्या बाबतींत बरोबरी करणारे होते, हें निश्चित होतें.

अर्थशास्त्र—व्यक्तींच्या उद्योगापासून समाजावर कोणते बरे वाईट परिणाम होतात आणि सामाजिक परिस्थितीचे व्यक्तींच्या धंदेविषयक उद्योगावर कोणते परिणाम होतात हें मुख्यतः सांगणारें शास्त्र.

चित्रकला, पाकशास्त्र, शिलालेख, चाणक्याचें नीतिशास्त्र वगैरे वरील असलेले संस्कृत ग्रंथ पाहिल्यास अथवा हल्ली विद्वानांकडून संस्कृतांतील निरनिराळ्या विषयावर होणारीं भाषांतरें, नवीन संशोधनें, उपयुक्त अशें अप्रसिद्ध ग्रंथांचें प्रकाशन करणाऱ्या संस्था पाहिल्यास संस्कृत वाङ्मय सर्वांगपरिपूर्ण असें आहे हें सिद्ध होतें. कारण ' जें वाङ्मय निकामी तें कालाच्या प्रवाहांत केव्हांच नाहिसें होतें. आणि जें वाङ्मय उपयुक्त, दमदार, तेजस्वी, मनोहर, असतें तेंच टिकून राहतें. ' या दृष्टीनें ' संस्कृत वाङ्मय ' हें ' अमरवाङ्मय ' आहे म्हणजे नाश न पावणारें असें आहे म्हणूनच त्याला जगांत श्रेष्ठपतीचा मान मिळाला हें मान्य करावें लागेल.

उपकारस्मरण—( अ ) सर्वांना संस्कृत भाषेच्या अध्ययनाकडे प्रवृत्त करणाऱ्या ह्या पुस्तकाच्या प्रकाशनाला आर्थिक मदत देऊन सर्वांना संस्कृतभांडारदर्शन घडविण्याचें पुण्य मिळविणाऱ्या व उपयुक्त काम करणाऱ्या तरुणांना हस्तेपरहस्तें मदत करून नेहमी प्रोत्साहन देणाऱ्या अशा गृहस्थांनीं व विशेषतः हल्लीच्या युद्धजन्य महागाईच्या परिस्थितींत पांढरा कागद मिळत नाहीं परंतु मुंबईच्या डेक्कन पेपरमिलचे मालक व्यवस्थापक, श्रीमंत एफ्. डी. पदमजी, यांनीं ह्या पुस्तकाचें महत्त्व जाणून पुस्तकाला लागणारा सर्व कागद देणगी दिला म्हणूनच हें पुस्तक वाचकांच्या हातीं देण्याची संधि मला मिळत आहे. या देणगीबद्दल श्रीमंत एफ्. डी. पदमजी यांचा मी अत्यंत ऋणी आहे.

( आ ) ज्यांनीं मला वैदिकाश्रम पुणें, येथें आणून ठेऊन संस्कृतादिकांच्या अध्ययनाकडे प्रवृत्त केलें असा कै० गु. विनायक महाराज शास्त्रे

( ई ) विशेषतः आमच्या न्यूइंग्लिशस्कूलचे सुपरिंटेंडेंट प्रो. वि. ना. कुमारे, एम्. ए. यांनीं मला स्कूलमध्ये संस्कृतभाषा शिकविण्याची संधी देऊन नेहमी प्रोत्साहन दिलें याबद्दल प्रो. कुमारे यांचा ऋणी आहे.

( उ ) श्री वि. सि. चितळे, बी. ए. बी. टी. डी. असिस्टंट सुपरिंटेंडेंट (रमणबाग), श्री. प्रो. गो. करमरकर, एम्. ए. बी.टी. (अ. सुपरिंटेंडेन्ट, नानावाडा ) श्री जोशी, एम्. ए. बी. टी ( असिस्टंट सुपरिंटेंडेंट नानावाडा ) श्री. गोंधळेकर, एम्. ए. बी. टी. ( अ. सुपरिंटेंडेंट, रमणबाग ) यांनीं वेळोवेळीं दिलेल्या प्रोत्साहनाबद्दल मी ऋणी आहे.

( ऊ ) कै॰ विष्णुपंत उर्फ मामासाहेब देशपांडे ( माझे श्वशुर ) यांच्या सूचनांचा व पुस्तकांचा मदत् श्रीमती लक्ष्मीबाई बोपर्डीकर, सेवानिवृत्तशिक्षिका ( माझ्या आतेसासू ) यांच्या संग्रहीं असलेल्या संस्कृत विषयक मराठी पुस्तकांचा व प्रोत्साहनाचा मला अत्यंत उपयोग झाला याबद्दल त्यांचा मी ऋणी आहे.

श्री. रा. वि. ऐले, व श्री. मधुकरपंत गाडे, व्यवस्थापक प्राज्ञप्रेस, वाई यांनीं पुस्तकाचें छापण्याचें काम सुबक व वेळेवर करून दिलें याबद्दल त्यांचे आभार मानतो.

या पुस्तकांत चांगले जे गुण असतील त्यांचें सर्व श्रेय माझ्या गुरुकडे आहे. मात्र दोषांबद्दल मीच जबाबदार आहे.

वाचकांना येणाऱ्या अडचणी किंवा दोष मला कळविल्यास मी सुधारीन. एवढें सांगून हा ‘ संस्कृतभांडारपरिचय ’ वाचकांच्या हातीं देतो.

| | |
|---|---|
| ६०८ नारायण पेठ,<br>मुजुमाच्या बोळ, पुणें. | ना. वा. तुगार<br>गुरुवार ता. २३ जुलै १९४२ |



# अनुक्रमणिका

# शुद्धिपत्र



| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १४ | २४ (प्रस्तावना) | वैधिकाश्रम | वैदिकाश्रम |
| ७ | १० | नित्य | नित्यं |
| १४ | १७ | सिंहफल | सिंहफलं , |
| १७ | ६ | कै. विष्णुबुवा जोग. कै. देशमुख | श्री. आठले, भिडे. |
| २७ | ३ | यद्यसेर्यं कृते | यद्यसेऽर्थंकृते |
| २७ | ४ | उपदेश युजे | उपदेशयुजे |
| २९ | १५ | स्यात्तु | स्यात्तुं |
| ८५ | ४ | नाकायां | नौकाया |
| ८६ | ३ | शूलेच | शूले च |
| ९४ | १ | निदानं तथा | निदानं शमनं तथा |
| ९४ | ६ | सुखमाधनम् | सुखसाधनम् |
| १०१ | २२ | श्रद्धोदकं | शुद्धोदकं |
| ११८ | २० | पोल्समधील | पोल्डमधील |
| १४५ | ४ | रिचर्स | रिसर्च |
| १६० | १९ मध्ये किंमत १२ आणे याच्यापुढें ( भाग २ रा व ३ रा प्रसिद्ध होत आहेत ). | | |

——×——

ॐ

# संस्कृतभांडारपरिचय.

## संस्कृतभाषापरिचय.

महत्त्व—संस्कृत भाषा ही बहुमोल अशा प्राचीन वाङ्मयाची एक मोठी खाणच आहे. म्हणून या भाषेचा अभ्यास १ भाषाशास्त्र. २ इतिहाससंशोधन. ३ सनातनवैदिकधर्म. ४ तत्त्वज्ञान. या दृष्टींनीं सर्व जगाला उपयुक्त असून वेद ( ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्ववेद, ), वेदांगें ( शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंद, ज्योतिष ), प्राचीन सहा शास्त्रें ( दर्शनें— न्याय, वैशेषिक, सांख्य, योग, पूर्वमीमांसा, उत्तरमीमांसा (वेदांत). स्मृति, पुराण, काव्य, अलंकार, नाट्यशास्त्र, नाटकें, चंपू, भाण, वैद्यक, संगीत, शिल्पशास्त्र, अर्थशास्त्र, चित्रकला, पाकशास्त्र वगैरे आपल्या पुरातन वाङ्मयविभागाचें आपणास ज्ञान करून देण्याचें संस्कृतभाषा हेंच एक उत्तम साधन आहे. इतकेंच नव्हे तर पालीभाषेंत जशी बौद्धांची ग्रंथनिर्मिति आहे किंवा अर्धमागधींत जशी जैनांची ग्रंथनिर्मिति झाली तशी संस्कृतभाषेंतही झाली असल्यामुळें त्या मतांचेंही ज्ञान करून देण्याचें साधन संस्कृतभाषा आहे. संस्कृतभाषेचें महत्त्व ओळखून युरोपांतील सर्व युनिव्हर्सिट्यांतून संस्कृतभाषेचा अभ्यास मोठ्या आस्थापूर्वक केला जातो. संस्कृतभाषेच्या गुणांची पारख होण्यास व तिचा युरोपांत प्रचार होण्यास मॅक्समुलर वगैरे पाश्चात्य संस्कृतपंडितांचे निरपेक्ष परिश्रमच कारण झाले.

हिंदुलोकांचा सर्वच जीवनक्रम धर्मप्रधान असल्यानें संस्कृत-भाषेचा अभ्यास हिंदुमात्रास इतरापेक्षां जास्त फायदेशीर आहे म्हणूनच हायस्कुलांतील चोथीपासून ते मॅट्रिक पर्यंत व पुढें एफ्. वाय्. ते एम्. ए. पर्यंतच्या अभ्यासक्रमांत संस्कृतभाषा ठेविली आहे.



## भाषा

**भाषा** — आपल्या अंतःकरणांतील अभिप्राय दुसऱ्याला समजून देण्याकरितां उच्चारला जाणारा जो आवाज त्याला **भाषा** असे म्हणतात.

**पोटभाषा**—भाषा ही समाजाच्या ताब्यात असते (तसा समाजहि भाषेच्या ताब्यात असतो ) संस्कृति, धर्म, सत्ता, लढाई, दुष्काळ, उचनीचभाव, धरणीकंप, वगैरे कारणांनीं समाजाच्या स्वरूपांत पालट होतो त्यामुळे भाषा बदलते. नंतर त्या भाषेला **'पोटभाषा'** असें नाव पडतें, पुढें ती भाषा मुख्य भाषेसारखी होऊन दुसरी भाषा निर्माण करणारी होते.

**भाषाफरक**—इंग्लिशचे उदाहरण घेतल्यास १ जुने इंग्लिश, २ चॉसर इंग्लिश, ३ शेक्सपीअर इंग्लिश, ४ व्हिक्टोरियन इंग्लिश, असे काला-प्रमाणे भाग पडतात. त्याशिवाय १ कॉर्नवाल इंग्लिश, २ यार्क इंग्लिश, ३ लंडन इंग्लिश, असे पोटभेद इंग्लिश भाषेचे आहेत.

**मराठी पोटभेद**— १ यादवकालीन मराठी ( ज्ञानेश्वर, नामदेव, हेमाडपंत वगैरे ). २ बहामनी कालीन मराठी ( एकनाथ, दासोपंत, ). ३ शिवकालीन मराठी ( रामदास, तुकाराम ) ४ पेशवे कालीन मराठी ( मोरोपंत, रामजोशी ). ५ इंग्रजकालीन मराठी — छत्रे, चिपळूणकर, टिळक, तात्यासाहेब केळकर, जोशी, अत्रे, फडके, खाडेकर, त्याचप्रमाणे

**संस्कृत पोटभेद**—१ वेदकालीन संस्कृत. २ ब्राह्मणकालीन संस्कृत.

३ उपनिषद्कालीन संस्कृत. ४ रामायण–महाभारतकालीन संस्कृत. ५ कालिदासादि कविकालीन संस्कृत, असे संस्कृतभाषेचे पोटभेद आहेत.
तात्पर्य–एक राजकीय सत्ता, एक धर्म, एक संस्कृति, एकच सुधारणा, असे असेल तर मूळच्या भाषेंत फारसा फरक होणार नाही, तसे न घडल्यास भाषाभेद थांबत नाहीत.

**संस्कृतभाषा व हल्लीच्या देशी भाषा यांना जोडणारे कांहीं दुवे.**

| संस्कृत | पाली | अर्धमागधी | मराठी |
|---|---|---|---|
| तडाक (ग) | तळाक | तलाअ | तलाव |
| नापित | न्हापित, नहापित | न्हाविअ | न्हावी, हिंदी-नाई |
| दोहद | दोहळ | डोहळ | डोहाळा |
| मत्कुण | मंकुण | ढिंकुण | ढेकुण |
| भिक्षाचारी | भिक्खाचारी | भिक्खाआरी | भिकारी |
| पुस्तक | पोत्थक | पोत्थअ | पोथी |
| आर्द्र | अल्ल | उल्ल | ओल |

| संस्कृत | पाली | अर्धमागधी | हिंदी | गुजराथी | मराठी |
|---|---|---|---|---|---|
| भगिनी | भगिनी | भइणी | बहिन | बहेन | बहीण |
| आम्र | अंब | अंब | आम | आंबु | अंबा |
| पश्चात् | पच्छा | पच्छा | पीछे | पछी | .... |
| शृंग | सिंग | सिंग | सींघ | शिंगडुं | शिंग |
| षोडश | सोळस | सोळस | सोळह | सोळ | सोळा १६ |

नाही. भाग्याची व अभिमानाची गोष्ट ही की असें उत्कृष्ट वाङ्मय शत्रु-हल्ला, जाळपोळ, जलप्रलय, धरणीकंप, वगैरे संकटातून आर्यलोकांनीं जसेंच्या तसेंच गुरुमुखानें सथा घेऊन वंशानुवंश पाठांतरात ठेऊन सरंक्षित केलें हें हल्लीच्या वैदिक व धार्मिककृत्य चालविणारे पुरोहित (याज्ञिक), वगैरेंच्या पठणावरून कळतें. प्राचीन मानवसमाजाचे धर्म, आचार, भावना, वगैरेंचे उत्तम प्रतिबिंब वेदामध्यें दिसतें म्हणून मॅक्समुल्लर वगैरे युरोपीयन संस्कृत पंडितांनीं वेदांच्या अभ्यासाकरिता आयुष्य खर्च केलें व वेदाचें भाषांतर करून आर्यसंस्कृतीचा प्रचार केला तरी आम्हीं वैदिकवाङ्मयाचा अभ्यास करून आर्यांच्या संस्कृतींचे दर्शन घ्यावें हें साहजिकच आहे.

वेदाचे पोटविभाग-- १-संहिता--या संहितेंत, स्तोत्रें, प्रार्थना, आशीर्वादात्मक सूक्तें, यज्ञाचे मंत्र आहेत. २ ब्राह्मण (गद्यग्रंथ)-- यात देवादिकांच्या गोष्टी, यज्ञाविषयीं विचार. निरनिराळ्या ऋतूतील क्रियांचें व्यावहारिक व आध्यात्मिक महत्त्व वर्णन केलें आहे. ३ आरण्यकें व उपनिषदें-- यात ऋषींचे ईश्वर, जग, मनुष्य, यांचे परस्पर संबंध काय आहेत वगैरे आध्यात्मिक विचार आहेत. श्रुतीचा शेवटचा भाग म्हणून यास वेदांत असे म्हणतात.

गायत्रीमंत्र--जो आमच्या बुद्धींना प्रेरणा देतो त्या सवितृदेवाच्या स्पृहणीय अशा तेजाचें आम्हीं चिंतन करतो.

तत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि । धियो यो नः प्रचोदयात्
ऋ. सं. ३-४-१०

श्रमस्तुति--१ श्रमाशिवाय श्रीची प्राप्ति होत नाहीं. (नानाश्रान्ताय श्रीरस्ति। ऐ. ब्रा. ७।१५)

२ श्रमाशिवाय देव सख्य करीत नाहीत. न ऋते श्रान्तस्य सख्याय देवाः । ऋ. ४-३३-११

**बलोपासना**--हे ईश्वरा, तूं तेजस्वी, वीर्यवान, ओजस्वी (ब्रह्मचारी, कांति-मान), उत्साही, सहनशक्तीनें युक्त असा आहेस, तूं माझ्या ठिकाणीं तेज, वीर्य, बळ, सामर्थ्य, उत्साह, उत्पन्न कर. हे गुण माझ्यांत विकास पावोत.

तेजोऽसि तेजो मयि धेहि । वीर्यमसि वीर्यं मयि धेहि ।
बलमसि बलं मयि धेहि । मन्युरसि मन्युं मयि धेहि ।
सहोऽसि सहो मयि धेहि । यजु. १९-९

**ब्रह्मचर्यमहिमा**--ब्रह्मचर्यरूपी तपामुळें देवांनीं मृत्यूचा नाश केला.

ब्रह्मचर्येण तपसा देवा मृत्युमुपाघ्नत । अथर्ववेद ११-५-१९

**आयुष्य**-( १ ) १०० वर्षे आम्ही जगूं या. १०० वर्षे पाहूं या. ( २ ) १०० वर्षे दीन न होता राहूं या. ( ३ ) १०० वर्षे पुष्ट होत राहूं या. ( ४ ) अजिंक्य होऊन १०० वर्षे जगूं या.

( १ ) पश्येम शरदः शतम् । जीवेम शरदः शतम् । ऋ. ७-६६-१६
( २ ) अदीनाः स्याम शरदः शतम् । भूयश्च शरदः शतात् ।
यजु. ३६-२४
( ३ ) पूषेम शरदः शतम् । भूयसीः शरदः शतात् । अथर्ववेद १९-६७
( ४ ) अजिताः स्याम शरदः शतम् । तै. आर. ४-४२

**राजसंस्थेचें धोरण**--मी या प्रजाजनांचीं शस्त्रास्त्रें सज्ज करीन, यांच्या राष्ट्राची शूर पुरुषांच्या साह्यानें मी उन्नति करीन. या राष्ट्राचें क्षात्रतेज नाहिसें होणार नाही, अशी दक्षता घेईन. त्याप्रमाणें विद्वानांच्या मदतीनें प्रजेच्या विजयशाली मनाचें, उत्साहाचें, नेहमीं रक्षण करीन.

एषामहमायुधा संस्याम्येषां राष्ट्रं सुवीरं वर्धयामि । एषां क्षत्रम-जरमस्तु जिष्ण्वेषां चित्तं विश्वेऽवन्तु देवाः । अथर्ववेद ३-१९-५

**कर्तव्यें**— तूं आईला देवाप्रमाणें मान, वडिलांना देवाप्रमाणे मान, शिकविणाराला देवाप्रमाणें मान.

मातृदेवो भव। पितृदेवो भव। आचार्यदेवो भव। तैत्तिरीय आरण्यक

**प्रार्थना**—हे परमात्म्या, तूं आम्हा गुरुशिष्यांचे रक्षण करावे, दोघांकडून मोठे पराक्रम होऊं देत, आमचें ज्ञान तेजस्वी राहावें, आम्ही एकमेकांचा द्वेष करूं नये, नेहमी शांति असो.

ॐ सहनाववतु। सहनौ भुनक्तु। सहवीर्यं करवावहै। तेजस्विना वधीतमस्तु। मा विद्विषावहै। ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः। कृ० यजुर्वेद. प्रपाठक, ८.

**वेदसंशोधक**--१ यास्काचार्य २ सायणाचार्य ३ दयानंदसरस्वती ४ ईश्वरचंद्र विद्यासागर ५ रा. पो. पंडित ६ कै. का. वा. लेलेशास्त्री वाई. प्रो. राजवाडे, पं. चित्रावशास्त्री, पं. धुंडिराज दिक्षित वापट श्रौताचार्य, श्री. बाबासाहेब पटवर्धन. वगैरे आधुनिक भारतीय व मॅक्समुलर, व्हिटने, याकोबी, वगैरे युरोपियन.

**वैदिक संशोधन संस्था**—१ वैदिक संशोधन मंडळ, पुणें २ स्वाध्याय-मंडळ, औंध. ३ स्वाध्याय मंदिर, पांचवड जि. सातारा.

**वेदाच्या संबंधी माहिती देणारे ग्रंथ**—कै. डॉ.श्रीधर व्यंकटेश केतकर यांचा मराठी भाषेत 'ज्ञानकोश' भाग २ वेदविद्या प्रकरण. कै. का. वा. लेले शास्त्रीकृत 'वेदविचार'.

---

## रामायण परिचय

**महत्त्व**—रामायणांत वैयक्तिक सद्गुणांची पराकाष्ठा दिसते म्हणून रामायण हें व्यक्तिधर्माचा आदर्श ग्रंथ आहे. किंवा अनार्यसंस्कृतीवर आर्य संस्कृतीचा विजय कसा झाला ते दाखविणारा ग्रंथ आहे.

कांडे–१ बालकांड ( सर्ग ७७ ), २ अयोध्याकांड (सर्ग ११९ ), ३ अरण्यकांड, ( सर्ग ७५ ), ४ किष्किंधा कांड ( सर्ग ६७), ५ सुंदरकांड ( सर्ग ६८ ), ६ युद्धकांड ( सर्ग १३१), ७ उत्तरकांड ( सर्ग १११ ).

**रामाची योग्यता–** १ प्रजानुरंजनी, २ योद्धा, ३ संकटाच्या वेळीं न डगमगणारा, ४ पितृभक्त, ५ गुरुभक्त, ६ सत्यवचनी, ७ एकपत्नीव्रती, ह्या विशेषणांच्या वरून रामाचें चरित्र डोळ्यापुढे येते.

**सीतेची योग्यता–** पतिव्रता स्त्रियांच्या पंचकांत सीतेची गणना होते.

> अहल्या द्रौपदी सीता तारा मंदोदरी तथा।
> पंचकं ना स्मरेन्नित्य महापातकनाशनम् ॥

**विशेषगुण–** शरिराला कितीहि कष्ट पडोत, कितीहि दुःखे येवोत पण आपल्या मूळ ध्येयांत, दानतींत, थोडासुद्धां फरक होऊं द्यावयाचा नाहीं. हा सीतेच्या वर्तनाचा ' आदर्श ' आहे. सीता ही सौजन्य, पवित्रता, पातिव्रत्य, यांची जिवंत मूर्ति आहे.

**लक्ष्मणाची योग्यता–** पित्याचें वचन पाळण्याकरितां राम व सीता यांना १४ वर्षे वनवास पत्करावा लागला. परंतु लक्ष्मणाला वनवासाचा त्रास सोसण्याची काय जरूरी ? तर केवळ बंधुप्रेम, बंधुसेवा, हेंच मुख्य कारण आहे. रामानें लक्ष्मणाला वनवासांत जाण्याचे वेळीं 'तूं परत जा' असें सांगितलें तेव्हां लक्ष्मणानें असे उत्तर दिलें कीं 'पाण्याबाहेर काढलेला मासा जसा जिवंत राहात नाहीं तशी माझी स्थिति होईल. '

**भरताची योग्यता–** कैकेयीनें ' भरत ' नांवाच्या आपल्या मुलाकरितां भयंकर लोकापवाद सोसून दशरथ राजाला ( आपल्या

नरन्याला ) प्राप्त होईल याची पर्वा न करितां त्याला वचनांत पकडून राज्य मिळविलें, अशा राज्याचा भरतानें स्वतः उपभोग घ्यावयाचा. पण तें न करिता उलट त्यानें राज्य रामाच्या स्वाधीन करण्याची खरोखरीच जरूर नव्हती परंतु अधर्म, अपकीर्ति, होईल यामुळें भरतानें राज्यत्याग केला. सगळ्यांच्या त्यागापेक्षां भरताच्या त्यागाला जास्त महत्त्व आहे.

**मारुतीची योग्यता**— रामाचे सेवकत्व, सीताशोधनादि कार्ये, पराक्रम वगैरेमुळें मारुतीची योग्यता अधिक आहे.

**रामायण कथानक**— कोसल देशाच्या **दशरथ** नावाच्या राजाला कौसल्या, कैकेयी, सुमित्रा, अशा तीन बायका होत्या. राम, लक्ष्मण, भरत, शत्रुघ्न, असे चार मुलगे होते. रामाची माता **कौसल्या**. पत्नी-सीता, पुत्र-लव आणि कुश. लक्ष्मणाची माता-**सुमित्रा**. पत्नी-**उर्मिला**. भरताची माता-**कैकेयी**, पत्नी-**मांडवी**. शत्रुघ्नाची माता-**सुमित्रा**. पत्नी-**श्रुतकीर्ति**. विदेह देशाच्या **जनक** नावाच्या राजानें आपली कन्या **सीता** हिच्या लग्नासाठीं असा पण लाविला कीं—' जो कोणी धनुष्य ( शिवधनुष्य ) वांकवील त्याला मी सीता देईन ' त्याप्रमाणें रामानें मनुष्याला न पेलणारें असें तें धनुष्य वाकवून मोडून टाकलें. नंतर सीतेचें रामाशीं लग्न लागलें. दशरथाच्या मनात रामाला राज्यावर बसवावें असे होतें. परंतु कैकेयीला ते न पटल्यामुळें तिनें मागून घेतलेल्या दोन वराचा उपयोग असा केला कीं १ भरताला राज्यावर बसविणें. २ रामाला वनवासाला धाडणें त्याप्रमाणें दशरथाला नाइलाजास्तव संमति द्यावी लागली. नंतर रामानें वनवास पत्करला, रामाबरोबर त्याची पत्नी-सीता, भाऊ-लक्ष्मण हेंही गेलें. कांहीं दिवस

ते सर्वजण नाशिक जवळील पंचवटींतल्या तपोवनांत राहिले. तेथें ' **शूर्पणखा** ' नांवाची रावणाची बहीण त्यांना भेटली व तिनें रामाशी लग्न लावण्याची इच्छा दाखविली. परंतु रामानें मी विवाहित आहे. लक्ष्मणाला तूं वर असें सांगितलें. लक्ष्मणानें तिचें नाक कापून तिला हांकलून दिलें. नंतर ती शूर्पणखा आपल्या भावाकडे म्हणजे रावणाकडे गेली व त्याला तिनें घडलेली सर्व हकीकत सांगितली. त्यामुळें रावणाला भयंकर राग आला व अपमान वाटला. त्या प्रसंगाचे उट्टे काढावें ( सूड उगवावा ) ,म्हणून भिक्षेकऱ्याच्या वेशानें येऊन रावणानें सीतेला फसवून नेली. राम–लक्ष्मण यांना तें कळल्यावर त्यांनीं रावणाबरोबर युद्ध करून सीतेची सोडवणूक करण्याचे ठरविलें. नंतर ते निघाले तेंव्हां ज्या ' सुग्रीव ' नांवाच्या राजाला 'वाली' नांवाच्या त्याच्या भावानें राज्यभ्रष्ट केलें होतें त्या वालीला राम–लक्ष्मण यांनीं ठार मारून सुग्रीवाला परत त्याचें राज्य मिळवून दिलें. पुढें सुग्रीवानें रामाचे उपकार मनांत ठेऊन आपलें सैन्य त्याच्या मदतीसाठी दिलें. नंतर रामाचे व रावणाचे भयंकर युद्ध झालें त्यांत रामानें रावणाचा पराजय करून ठार मारलें.



सज्जनांचे चारित्र्य हें भूषण आहे. सन्तश्चारित्रभूषणाः ।६–११३–४२

उत्साह—उत्साही माणसें कोणत्याही कार्यांत खचून जात नाहींत

उत्साहवन्तः पुरुषा नावसीदन्ति कर्मसु । ४–१–१२३

लक्ष्मण रामाला म्हणतो—हे आर्या, उत्साह हा अत्यंत बलवान आहे. उत्साहापेक्षां दुसरें श्रेष्ठदर्जाचें असें बल ( सामर्थ्य ) नाही. उत्साही माणसाला जगामध्यें मिळण्यास अशक्य असें कांहींच नाही.

उत्साहो बलवानार्य नास्त्युत्साहात्परं बलम् ।
सोत्साहस्य लोकेषु न किञ्चिदपि दुर्लभम् ॥ ४–१–१२२

मूर्ख-कोणत्याही कर्माला सुरुवात करण्याच्या वेळीं त्याच्या फलासंबंधी उत्कृष्टभाव, निकृष्टावस्था व गुण-दोष, जो जाणीत नाही त्याला मूर्ख म्हणतात.

गुरुलाघवमर्थानामारम्भे कर्मणां फलम् ।
दोषं वा यो न जानाति स बाल इति होच्यते ॥ २-६२-७

श्रेष्ठ— जो मनुष्य उच्चारिलेले शुभ किंवा अशुभ वाक्य खरें करून दाखवितो तोच धीरपुरुष श्रेष्ठ होय.

शुभं वा यदि वा पापं यो हि वाक्यमुदीरितम् ।
सत्येनप्रतिगृह्णाति स धीरः पुरुषोत्तमः ॥ ४–३०–७२

रागीट माणसाला सर्व भितात

सर्वे चण्डस्य बिभ्यति । ६–२–२१

वडिलांच्या मर्जीप्रमाणे वागणाऱ्याला स्वर्ग, द्रव्य, धान्य, विद्या, पुत्र, आणि सुख ह्यांपैकीं कांहींच दुर्लभ नाही.

स्वर्गो धनं वा धान्यं वा विद्याः पुत्राः सुखानि च ।
गुरुवृत्त्यनुरोधेन न किञ्चिदपि दुर्लभम् ॥ २–३०–३६

**भाषांतरें**— मराठी, १ चिपळूणकर आणि मंडळी. पुणें. भाग ३ किंमत रु. १५. २ कै. बा. लेलेशास्त्री कृत, ही सर्व दुर्लभ.



## महाभारत परिचय

एक लक्ष श्लोकांचा **'महाभारत'** ग्रंथ आहे. यांत १ आदिपर्व. २ सभापर्व. ३ वनपर्व. ४ विराटपर्व. ५ उद्योगपर्व. ६ भीष्मपर्व. (भगवद्गीता.) ७ द्रोणपर्व. ८ कर्णपर्व. ९ शल्यपर्व. १० सौप्तिकपर्व. ११ स्त्रीपर्व. १२ शांतिपर्व. १३ अनुशासनपर्व. १४. आश्वमेधिक पर्व १५ आश्रमवासिपर्व. १६ मौसलपर्व. १७ महाप्रस्थानिकपर्व. १८ स्वर्गारोहणपर्व. (१९ हरिवंशपर्व—महाभारतपर्व ) अशी अठरा पर्वे आहेत.

वेदामध्यें जितका विषय आहे तितका सर्व विषय व्यासांनी महाभारतांत सांगितला आहे म्हणून यांस पांचवा वेद असें म्हणतात. ते वाचण्याचा सगळ्या जातींना अधिकार आहे.

त्या सामना झाला, त्यामध्ये अर्जुनानें नेम मारण्यात पहिला नंबर पटका-विला, त्यामुळें दुर्योधनाला ते बरें वाटले नाहीं म्हणून त्यानें पाच पाडवाना ठार मारण्याचें ठरविलें व त्याना दान पाठविलें आणि ज्या ठिकाणीं ते वस्ति करून राहात होते त्या ठिकाणाला आग लावली; परतु त्याचा पाडव मारण्याच्या दृष्टीनें काहीहि उपयोग झाला नाही. नतर ' द्रुपद ' नावाच्या पाचाल देशाच्या राजानें आपल्या मुलीचे स्वयवर आरभिले. अर्जुनानें ' पण ' जिंकल्यामुळें द्रौपदीनें अर्जुनाला वरलें. लग्नाच्या संबंधामुळें पाडवाना द्रुपद राजाचे साहाय्य लाभले, त्यामुळें पाडवानीं राज्याचा हिस्सा मागितला. पुढें हस्तिनापुरी आणि गगानदीच्या काठचा सर्व प्रदेश कौरवानीं आपल्याकडे ठेवला व ' यमुना ' नदीच्या काठचा प्रदेश पाडवाना दिला. दिल्ली जवळ एकदा धर्मराजाला द्यूत खेळण्याकरिता दुर्योधनानें बोला-विले व कपटाने द्यूत ( जुगार ) खेळून धर्मराजाकडून राज्य लुबाडून घेतले आणि बारा वर्षपर्यंत त्याना वनवासात राहण्याची अट घातली. त्याप्रमाणे पाडवानीं बारा वर्षें वनवासांत घालवून एक वर्ष विराट राज्यात अज्ञात स्थितींत घालविलें. नतर कौरवाच्याकडे राज्याची मागणी केली. दुर्योधनानें ती नाकारली म्हणून पाडवानीं आपल्या न्याय्य हक्कासाठीं युद्ध केलें. द्वारकाधीश भगवान श्रीकृष्ण पाडवाचा मित्र व साहाय्यकर्ता होता. अर्जुनानें सुभद्रा नावाच्या श्रीकृष्णाच्या बहिणीशी विवाह केला. युद्धात अर्जुनाच्या रथाचा श्रीकृष्ण सारथी बनला होता. युद्धात पाडवाना विजय मिळाला. धर्मराजानें काही काळ राज्य केलें. नतर अर्जुनाच्या नातवाला म्हणजे परिक्षिताला राज्यावर बसवून सर्व पाडव हिमालयात गेले.

शरिरावर रोमांच ( आनंदाने ) उभे राहिले व ते म्हणाले 'अर्जुना, बाण सोड' त्या बरोबर मासपक्षाचे डोके खाली पडले.

## सुभाषितें

**विद्येचे शत्रु**(१) दुर्लक्ष्य, घाई, स्तुति, हे तीन विद्येचे शत्रु होत.

अशुश्रूषा त्वरा श्लाघा विद्यायाः शत्रवस्त्रयः ॥ ५-४०-४

**सुख**-( २ ) आळसांत अगोदर सुख वाटतें, परंतु त्याचा शेवट दुःखांत होतो. उद्योग करण्यांत अगोदर दुःख वाटते परंतु त्यापासून शेवटी सुख होते.

सुखं दुःखान्तमालस्यं दाक्ष्यं दुःखं सुखोदयम् । १२-२७-१२

**उत्तमांचा सहवास**--( ३ ) नेहमी सिंहाच्या जवळ असणारा त्याचा अनुयायी सिंहच बनतो. सिंह ज्याच्या बरोबर आहे तो स्वतः सिंह जरी नसला तरी त्याला सिंहाप्रमाणेच फळ मिळतें.

सिंहस्य सततं पार्श्वे सिंह एवानुगो भवेत् ।
असिंहः सिंहसहितः सिंहवल्लभते फलम् ॥ १२-११९-११

जो स्वतः सिंह असूनही कुत्र्यांच्या जमावामध्ये राहतो आणि सिंहाप्रमाणें कर्माचे फळ मिळविण्याची इच्छा करतो त्याला कुत्र्यांच्या सहवासांत असेपर्यंत तसें फळ मिळणें शक्य नाही.

यस्तु सिंहः श्वभिः कीर्णः सिंहकर्मफले रतः ।
न स सिंहफलं भोक्तुं शक्तः श्वभिरुपासितः ॥ १२-११९-१२

**पंडित**-बोलका, निरनिराळ्या मनोरंजक गोष्टी माहीत असलेला, समयसूचक, ग्रंथाचा अर्थ तावडतोब सांगणारा, तो मनुष्य पंडित होय.

प्रवृत्तवाक् चित्रकथः ऊहवान् प्रतिभानवान् ।
आशु ग्रन्थस्य वक्ता च यः स पण्डित उच्यते ॥ ५-३३-२८

**मूर्ख**--अध्ययन नसतांही घमेंड असलेल्या, दरिद्री असून मोठमोठ्या खर्चाच्या गोष्टी मनांत आणणारा, उद्योग न करितां पैसा मिळविण्याची इच्छा करणारा, अशा माणसाला शहाण्यांच्या कडून मूर्ख म्हटले जाते.

अश्रुतश्च समुन्नद्धो दरिद्रश्च महामनाः ।
अर्थांश्चाकर्मणा प्रेप्सुर्मूढ इत्युच्यते बुधैः ॥ ५-३३-३०

**गुणानें पुढें यावें**-- दुसऱ्यांची निंदा करून आपली उन्नति साधण्याची इच्छा बाळगूं नये. आपल्या अंगीं असलेल्या गुणांच्या जोरावर सामान्यलोकांपेक्षा वरचढ होण्याची इच्छा बाळगावी.

आत्मोत्कर्षं न मार्गेत परेषां परिनिन्दया ।
स्वगुणैरेव मार्गेत विप्रकर्षं पृथग्जनात् ॥ १२-२८७-२५

**दुर्जन**--दुसऱ्यांची निंदा करणें आणि चाहड्या करणें हा दुर्जनांचा स्वभावच आहे.

असतां शीलमेतद्वै परिवादोऽथ पैशुनम् । १२-१३२-११

**विद्यार्थ्यांचें सात दोष**-- आळस, मद-मोह, चंचलता, गप्पा, उद्धटपणा, अभिमान, लोभ. नेहमी हे विद्यार्थ्यांचे ठायीं सात दोष घडतात.

आलस्यं मदमोहौ च चापलं गोष्ठिरेव च ।
स्तब्धता चाभिमानित्वं तथाऽत्यागित्वमेव च ॥
एते वै सप्त दोषाः स्युः सदा विद्यार्थिनां मताः ॥ ५-४०-५ --

**भाषांतर**-- मराठी--१ चिपळुणकर आणि मंडळी, पुणें. २ दामोदर सावळाराम यंदे आणि मंडळी, मुंबई. आतां दुर्मीळ झाले आहेत.

**हिंदी**-- पं. श्रीपाद दामोदर सातवळेकर किंमत ६५ रु.

## भगवद्गीता

### परिचय

प्रत्येकाच्या मागे कांहीं ना कांहीतरी दुःख आहेच. लौकिक उपायांनीं अत्यंत दुःखनाश होत नाहीं म्हणून परमानंदाचा लाभही होत नाहीं. 'गुरूच्या ( ज्यानें सर्व शास्त्राचा पूर्ण अभ्यास केला आहे व त्यांतील तत्त्वें व्यवहारांत अमलांत आणलीं आहेत असा गुरु ) कडून शास्त्रादि विद्या शिकून सदाचरणी बनणें' हाच एक उपाय श्रुतीमध्यें सांगितला आहे. श्रुतीचे ठिकाणीं सर्वांना अधिकार नाहीं म्हणून भगवान व्यासांनीं सर्व वेदांचें तात्पर्य असलेली अशी भगवद्गीता महाभारताच्या भीष्मपर्वांत सांगितली.

**महत्त्व**—भगवद्गीतेचें अलौकिकत्व बरीच शतकें प्रस्थापित झालेलें आहे. ही गीता तोंडपाठ करून तिला वेदासारखी आदरणीय म्हणून मानणारे पृथ्वीतलावर लक्षावधि भक्त आहेत प्रस्थानत्रयी ( १ उपनिषद् २ वेदांतसूत्र. ३ भगवद्गीता. ) पैकीं एक ग्रंथ म्हणून शंकराचार्य, मध्वाचार्य, रामानुजाचार्य, वगैरे निरनिराळ्या मत-प्रवर्तक आचार्यांनीं गीतेवर भाष्यें लिहून गीतेची महती जगाला पट-विली आहे. खरोखरी ७०० श्लोकांची गीता यापेक्षा ब्रह्मसूत्रें, उप-निषदें, हे मोठे ग्रंथ असतांना गीतेलाच का महत्त्व आलें तर गीतेची साधी भाषा, संसारी माणसाच्या रोजच्या व्यवहारांतील सर्व विषयाचें थोडक्यात पण मार्मिक विवेचन. लोकांना सहज अमलांत आणतां येईल असा भक्तिमार्ग सांगितला आहे.

**प्रचार**—भगवद्गीतेचा प्रचार खालील प्रमाणे झाला.

१ शंकराचार्य, मध्वाचार्य, रामानुजाचार्य, वल्लभाचार्य, यानीं

गीतापठणपरीक्षा, गीतार्थपरीक्षा, गीताजयंतीच्या दिवशीं घेऊन त्यांना बक्षिसें देऊन प्रोत्साहन देण्याची व्यवस्था चालू ठेविलेली आहे. तद्वत् प्रौढ माणसांच्या करितां प्रचारक, वर्तमानपत्रें, मासिकें, व्याख्यानें, यांच्या द्वारा 'गीतोपदेश' करण्याची व्यवस्था सुरू ठेवलेली आहे.

५ गोरखपूर ( यू. पी. ) येथे हिंदुस्तानांतील धनिकांच्या मदतीनें एक संस्था स्थापन होऊन हिंदुधर्मीचें वाङ्मय अल्प किंमतीत प्रसिद्ध करण्याचा स्तुत्य उपक्रम सुरू केला आहे. या संस्थेनें भगवद्गीतेच्या अनेक प्रती प्रसिद्ध केलेल्या आहेत. कांहीं वर्षांपूर्वी हिंदिभाषेंतून 'गीताविशेषांक' प्रसिद्ध केला असून त्यांत आतापर्यंत गीतेवरच्या सर्व प्रतींचा उल्लेख केला आहे.

मुख्य—हनुमानप्रसाद पोद्दार. एजंट—नेर्लेकर बुकसेलर, पुणे २

**मराठी भाषांतरें**— लेखक-टिळक, केलुसकर, द्रवीड, बापटशास्त्री, लेलेशास्त्री, भिडेशास्त्री, भानू, ब्रह्मचारी विष्णुबुवा जोग ( सेतुबंधनी टीका ) वगैरे.

**हिंदी, इंग्लिश**— महात्मा गांधी, अनिबिझांट, अरविंद घोष, डॉ० कुर्तकोटी, वगैरे.

**गीतामंदिरः**— ' नवी दिल्ली ' येथें श्रीमान् जुगल किशोर बिर्ला यांनीं ' गीतामंदीर ' बांधिले असून त्यांत गीतेंतील प्रसंगाची उत्तम चित्रें भिंतीवर काढली आहेत.

## गीता सुभाषितें

**ज्ञान**— या जगांत ज्ञानासारखें पवित्र असे दुसरें कांहीं नाहीं.

नहि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते । अध्याय ३-श्लोक ३८

**कायिक तप**—देव, ब्राह्मण, वडील माणसें, गुरुजन, विद्वान्, यांचा

सन्मान राखणें; शुद्धवर्तन, आणि मनाचा सरळपणा असणें, ब्रह्मचर्य पाळणें ( विद्यार्थ्यांचा विद्यासंपेपर्यंत शुद्धआचरणाचा जीवनक्रम ), अहिंसा पाळणें ( दुसऱ्याला पीडा न करणें ), इतक्या गुणांच्या समुदायाला 'कायिकतप' ( शारीरिक तप ) असें म्हणतात.

देवद्विजगुरुप्राज्ञपूजनं शौचमार्जवम् ।
ब्रह्मचर्यमहिंसा च शारीरं तप उच्यते ॥ अध्याय १७, श्लोक १४

**वाचिक तप**— कोणाच्या अंतःकरणाला झोंबणार नाहीं असें सौम्य, खरें, गोड, कल्याणकारक भाषण करणें, वेद, शास्त्र, यांचें अध्ययन चालू ठेवणें याला वाङ्मयतप ( वाचिक तप ) असें म्हणतात.

अनुद्वेगकरं वाक्यं सत्यं प्रियहितं च यत् ।
स्वाध्यायाभ्यसनं चैव वाङ्मयं तप उच्यते ॥ अध्याय १७, श्लोक १५

**मानसिक तपः**—मनाची प्रसन्नता, आनंदी स्वभाव, परिमित भाषण, आत्मसंयमन, मनाची शुद्धता, अशा वागणुकीला 'मानसिक तप' असें म्हणतात.

मनःप्रसादः सौम्यत्वं मौनमात्मविनिग्रहः ।
भावसंशुद्धिरित्येतत्तपो मानसमुच्यते ॥ अध्याय १७ श्लोक १६

**कर्मभ्रांति**—कर्म ( कर्तव्य ) कोणतें व अकर्म ( करूं नये तें ) कोणतें या विषयीं शाहणे लोक सुद्धां मोहित ( भ्रांत ) झाले आहेत.

किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः । अध्याय ४, श्लोक १६

**सिद्धि**—आपापल्या कर्तव्यांत पूर्णपणें गढून गेलेल्या माणसाला सिद्धि मिळते.

# धर्म

## धर्म–परिचय

**धर्मव्याख्या**— पूर्वीच्या ऋषींनीं समाजाच्या धारणेकरितां तत्त्वज्ञानावर आधारलेल्या नियमास 'धर्म' असें म्हणतात.

**धर्मवाक्यें**— समाजाच्या धारण पोषणाला उपयोगीं पडणारा तोच धर्म.

धारणात् धर्ममित्याहुः ।

१ धर्म सर्व जगाचा आधार आहे. धर्मो विश्वस्य जगतः प्रतिष्ठा ।

२ सत्यासारखा श्रेष्ठ धर्म नाही. सत्यान्नास्ति परो धर्मः ।

३ सर्व धर्माच्या आधारानें चालतें. धर्मे सर्वं प्रतिष्ठितम् ।

**स्मृति**— वेदाच्या [श्रुतींच्या] खालोखाल स्मृतिग्रंथाचा अधिकार आहे. एकंदर १३५ स्मृत्या आहेत, त्यातील पुष्कळ स्मृत्या प्रसिद्ध आहेत. मात्र हल्लीं मनुस्मृति व याज्ञवल्क्यस्मृति ह्या दोन स्मृत्या जास्त मान्य झाल्या आहेत.

**विषय**— (१) हिंदूंना जन्मल्यापासून मरेपर्यंत जे निरनिराळे संस्कार करावे लागतात त्यांचे वर्णन.

(२) ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, यांची उत्पत्ति व कर्मे सांगितली आहेत.

(३) १ ब्रह्मचर्याश्रम. २ गृहस्थाश्रम. ३ वानप्रस्थाश्रम. ४ संन्यासाश्रम. यांच्या धर्मांचे वर्णन. ५ राजधर्म. ६ स्त्रीधर्म. ७ दिवाणी व फौजदारी वगैरे कायद्याचें वर्णन अध्याय ८ व ९ मध्यें आहे.

## धर्माच्या अभ्यासाकरितां कांहीं पुस्तकें (संस्कृतभाषेंतील)

| पुस्तकाचें नांव | लेखक | |
|---|---|---|
| १ निर्णयसिंधु | कमलाकरभट्ट | |
| २ धर्मसिंधु | काशिनाथोपाध्याय | |
| ३ सनातनधर्मप्रदीप | पंडितसंघ | |
| (प्रकाशक—संतोजी महाराज कुकुरमुंडे) | | |
| ■ मानवधर्मसार (श्लोक) | बाबु भगवानदास | ८ आ. |

## मराठी भाषेंतील

| पुस्तकाचें नांव | लेखक | |
|---|---|---|
| १ धर्मशास्त्रविचारपरीक्षण | गो. म. जोशी | १० आ. |
| २ धर्म हवा कशाला ! | ग. दा. सावरकर | १ रु. ४ आ. |
| ३ धर्मशिक्षण | पं. चित्रावशास्त्री | १ आ. |
| ४ हिंदुधर्मतत्व संग्रह | " " | २ आ. |
| ५ हिंदुधर्माचें स्वरूप व लक्षण | पं. सातवळेकर | ४ आ. |
| ६ सनातन धर्माचें स्वरूप | " " | ५ आ. |
| ७ स्वधर्माची ओळख | " " | ४ आ. |
| ८ धर्मशास्त्रमंथन | पं. द्विवेदशास्त्री | १ रु. |
| ९ आर्यधर्मोपपत्ति | ना. पै. पंडित | १ रु. ८ आ. |
| १० धर्मस्वरूपनिर्णय | पं. कोकजेशास्त्री | ३ रु. |
| ११ नवा आचारधर्म | " " " | ३ रु. |
| १२ हिंदुधर्म आणि सुधारणा | म. शि. गोळे | ३ रु. |
| १३ धर्मशास्त्रविचार ( इंग्लिश ) | पां. वा. काणे | |
| १४ सर्व श्रेष्ठ हिंदुधर्म | दा. न. शिखरे | १२ आ. |
| १५ धर्मविज्ञान [हिंदी] | दयानंद | |

| | | |
|---|---|---|
| १६ नवा हिंदु धर्म | दिवेकर | ३ रु. |
| १७ हिंदुधर्माची समीक्षा | तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | २ रु. |
| १८ धर्मनिर्णयस्वरूप | विद्वद्रत्न के ल. दप्तरी | ४ रु. |
| १९ हिंदुधर्म आणि बुद्धिवाद | ग. रा. परांजपे | २ आणे. |

**हिंदुधर्माचे प्राचीन उद्धारक**—ब्रह्मा, वसिष्ठ, शक्ति, पराशर, व्यास, पैल, [ ऋग्वेदप्रवर्तक ], वैशंपायन [ यजुर्वेद प्रवर्तक ], जैमिनी [ सामवेद प्रवर्तक ], सुमंतु [ अथर्ववेद प्रवर्तक ], आद्यशंकराचार्य [ नंतर त्यांच्या चारी ठिकाणच्या पीठावरील शिष्य ] मध्वाचार्य, वल्लभाचार्य, रामानुजाचार्य, स्वामी रामकृष्ण परमहंस, दयानंदसरस्वती, स्वामी श्रद्धानंद, साधुसंत.

**परदेशांत धर्मप्रचार करणारे**— गौतमबुद्ध, स्वामी विवेकानंद ह्या दोन विभूति व त्यांचा असंख्य शिष्यगण.

**विद्यमानः**—श्री शंकराचार्य गुरुस्वामी ( शिरोळकर ), श्री शंकराचार्य ( प. जेरे शास्त्री ), शंकराचार्य डॉ. कुर्तकोटि, विनायकमहाराज मसूरकर, पाचलेगांवकर महाराज, पंडित मदनमोहन मालवीय, स्वातंत्र्यवीर विनायकराव सावरकर, डॉ. मुंजे, प. धुंडिराज दिक्षित बापट, प. दिवेकरशास्त्री, प. कोकजेशास्त्री, बाळस्वामी, प. चित्रावशास्त्री, आनंदमूर्ति डिंग्रजकर पति-पत्नी, प. लक्ष्मणशास्त्री जोशी तर्कतीर्थ, अहिताग्नि श. राजवाडे, महात्मा नारायणस्वामी स्वतंत्रतानंदजी, बन्सी लाल, श्री. गो. म. जोशी, श्री. बदामी, सत्यानंदजी, विश्वबंधूजीशास्त्री, अभय देवजी, भाई परमानंद.

**हिंदुधर्मोद्धारक संस्था**—वर्णाश्रमस्वराज्यसंघ, हिंदुमहासभा, आर्यसमाज, शंकराचार्यांचे मठ, मध्वाचार्यांचे मठ, रामानुजाचार्यांचे मठ, वाल्लभमठ,

वारकरी संप्रदाय, वगैरे संस्था हिंदुधर्माच्या उद्धाराचें कार्य करीत आहेत.

## हिंदुसमाजोद्धारक वाङ्मय

| पुस्तकाचें नांव | लेखक | किंमत |
|---|---|---|
| १ हिंदूंच्या चळवळीचें ध्येय व धोरण. | बॅ. स्वातंत्र्यवीर सावरकर | १ रु. |
| २ हिंदुत्व ( मराठी ) | ,, ,, | १ रु. |
| ,, ( इंग्रजी ) | ,, ,, | १२ आ. |
| ,, [ हिंदी ] | ,, ,, | ८ आ. |
| ३ हिंदुसमाजदर्शन | श्री. ल. ब. भोपटकर | १ रु. |
| ४ हिंदुसमाज समर्थ कसा होईल | पं. दिवेकरशास्त्री | १ रु. |
| ५ आर्यसंस्कृतीचा उत्कर्षापकर्ष १ भाग | ,, ,, | १ रु. |
| ६ संघटन बोधावली | म. तु. कुलकर्णी | २ आ. |

[ पत्ताः— म. तु. कुलकर्णी, धनी, हिंदुभाण्डार १५३८ नारायणपेठ, पुणें ]

## धर्मकोष्टक

| धर्म | संस्थापक | धर्मग्रंथ | धर्मभाषा |
|---|---|---|---|
| **हिंदुस्थान [ दक्षिण आशिया ]** | | | |
| १ हिंदुधर्म | .... | वेद | संस्कृत |
| २ बौद्धधर्म ( मत ) | गौतमबुद्ध | तिपिटक | पाली |
| ३ जैनधर्म ( मत ) | महावीर | आगम, | अर्धमागधी(संस्कृत) |
| ४ शीखधर्म ( मत ) | गुरुनानक | ग्रंथसाहेब, | पंजाबी फारशी ऊर्दु, प्राकृत, हिंदी, दाक्षीत्य. |
| **चीन-जपान [ पूर्व आशिया ]** | | | |
| ५ कान्फ्यूशियनधर्म | कान्फ्यूशियस् | पंच आदर्श ग्रंथ | चिनी |

| | | | |
|---|---|---|---|
| ६ टाओधर्म [चीनचा जुना धर्म] | टाओटझ् | टाओटेकिंग | चिनी |
| ७ शिंटोधर्म [जपान] | .... | .... कोजिकी or कमि-नोमिचि | जपानी |

### पॅलेस्टाईन ( पश्चिम आशिया )

इराण-अरबस्तान

| | | | |
|---|---|---|---|
| ८ यहुदीधर्म | | तोरा | हिब्रू |
| ९ झोरास्ट्रिअन धर्म [पारशी धर्म] | झोरास्टर | अवेस्ता | अवेस्ता |
| १० इस्लामधर्म [मुसलमान] | महंमद | कुराण | अरबी. |
| ११ खिस्तिधर्म | येशू | बायबल | इंग्लिश |

### अभ्यासार्थ पुस्तके

| पुस्तकाचे नांव | लेखक | किंमत |
|---|---|---|
| जगांतील विद्यमान धर्म | प्रो. रॉबर्ट अर्नेस्ट ह्यूम, अनुवादकः- रा. ब. आठवले | किं. रु. २ |
| आमचा प्रभु आणि तारणारा येशुखिस्त याचा नवा करार | पंडिता रमाबाई. | |
| रत्नमंजूषा [ होली बायबल ] | प्रकाशक- रिलिजस ट्रॅक्ट सोसायटी लंडन. | |
| आशियाचे धर्मदीप | गो. तळवलकर | किं. १ |
| जैनधर्मादर्श | रा. ने. शहा | किं. १ रु. |
| जैन धर्माची उदारता | प्र. द. रणदिवे | |

| | | |
|---|---|---|
| कुराणाचे मराठी भाषांतर | हकीमसूफी . | |
| पवित्र कुराण | मीर महंमद याकूबखान | |
| भगवान बुद्ध २ भाग. | प्रो. कोसंबी | ३ रु. |
| बौद्धधर्म | रा. ना. पाटणकर | १ रु. |
| बौद्धधर्माचा अभ्युदय व प्रसार | प्रो. प. ल. वैद्य. | १ रु.८आ. |
| बौद्धपर्व | वा. गो. आपटे | १ रु.८आ. |
| पारशांचा इतिहास (पारशी धर्माची माहिती) | मनोहर वि. कायबटे. | २ रु. ८ आ. |



## व्याकरण

उत्पत्ति—शंकराच्या डमरूंतून प्रथम 'अ इ उण्' वगैरे १४ सूत्रें बाहेर पडली. म्हणून त्यांस माहेश्वर सूत्रें असें म्हणतात. ह्या सूत्रांच्या आधारानें पाणिनीनें ( एक प्रसिद्ध व्याकरणकार ) 'अष्टाध्यायी' नांवाचा सूत्रात्मक ग्रंथ रचला. ह्यांत ८ अध्याय आहेत. प्रत्येक अध्यायांत ४ पाद असतात. मिळून ३२ पाद आहेत. सुमारें ४००० सूत्रें आहेत. वरील अष्टाध्यायींत वैदिक व लौकिक संस्कृतभाषेच्या व्याकरणाचे सर्व नियम सांगितलेले आहेत.

व्याख्या— शिष्ट लोकांचे प्रयोग हे भाषेचे आधार आहेत व तेच भाषेंत गांभीर्य, एकरूपता उत्पन्न करतात. या शिष्टांच्या प्रयोगांचे विवेचन करून व्यवस्था लावणारें जें शास्त्र त्यास 'व्याकरण' असें म्हणतात.

शब्दाचें स्वरूप म्हणजे काय, त्यांचा अर्थ काय असतो, वाक्यांत शब्दांचा एकमेकाशीं कसा संबंध असतो हे सर्व कळते.

**संस्कृतची पूर्वीचीं व्याकरणें–**

> ऐन्द्रं चान्द्रं काशकृत्स्नं कौमारं शाकटायनम् ।
> सारस्वतं च आपिशलं शाकलं पाणिनीयकम् ॥

**विशेष–** हल्ली पाणिनीचें संस्कृत व्याकरण सर्व ठिकाणीं मान्य व प्रचलित आहे.

| प्राचीन वैय्याकरणी | ग्रंथ |
|---|---|
| पाणिनी | अष्टाध्यायी |
| कात्यायन | वार्तिक |
| पतंजलि | महाभाष्य |
| भट्टोजी दिक्षित | सिद्धांतकौमुदी |

## काव्य

### काव्यपरिचय

व्याख्या– जें वाचल्यामुळें किंवा ऐकल्यामुळें रसिकाचें अंतःकरण प्रसन्न होऊन वर्णन केलेला रस - शृंगार, वीर, करुण, हास्य, रौद्र, भयानक, बीभत्स, अद्‌भुत, शांत- ह्यांपैकीं जो रस अंतःकरणांत सहज ठिबून जातो त्यास 'काव्य' असें म्हणतात.

> कवेः कर्म काव्यम् । वाक्यं रसात्मकं काव्यम् ॥ साहित्यदर्पण,
> स्फुटदलङ्कारं गुणवत् दोषवर्जितम् । अग्निपुराण.

**काव्याचा उपयोग—** कीर्ती, द्रव्यलाभ, व्यवहारज्ञान, अमंगलाचा

नाश, तावडतोब परमानंदाचा लाभ, पत्नीसारखा कोमल उपदेश ह्या गोष्टी मिळणें हाच काव्याचा खरा उपयोग होय.

काव्यं यशसेऽर्थ कृते व्यवहारविदे शिवेतरक्षतये ।
सद्यः परनिर्वृतये कान्ता सम्मिततयोपदेश युजे ॥

**प्रसिद्ध काव्यें**-रामायण, महाभारत, व १ रघुवंश. २ कुमारसंभव. ३ किरातार्जुनीय. ४ माघ. ५ नैषध. ही पंचमहाकाव्यें प्रसिद्ध आहेत.

## रघुवंश-परिचय

**सर्ग**-कालिदासाच्या काव्यग्रंथांत 'रघुवंश' हा प्रसिद्ध काव्य-ग्रंथ आहे. यांत १९ सर्ग आहेत. १ पहिल्या सर्गांत दिलीप राजाचें वर्णन आहे, त्याला मुलगा नसल्यामुळें तो आपले गुरु वसिष्ठ ऋषि यांच्याकडे जातो व त्यांना मुलगा न होण्याचें कारण विचारतो. नंतर वसिष्ठऋषि दिव्य ज्ञानानें त्याला 'सुरभि' नांवाच्या गाईच्या शापामुळें तुला मुलगा होत नाही तेव्हां तुला त्या गाईची सेवा केली पाहिजे असे सांगतात. ( २ ) दुसऱ्या सर्गांत दिलीपराजा व त्याची पत्नी सुदक्षिणा ही दोघे 'नंदिनी' नांवाच्या गाईची सेवा करितात. पुढे दिलीपराजा एकटाच अरण्यांत त्या गाईची एकवीस दिवस सेवा करतो. नंतर ती गाय दिलीपराजाची भक्ति मनापासून आहे किंवा नाही हे पाहण्याकरितां आपल्या सामर्थ्यानें एक सिंह उत्पन्न करून तो आपल्यावर हल्ला करतो असें दाखविते. नंतर दिलीपराजा रक्षणा-करितां धावतो परंतु त्याचा निरुपाय होतो आणि शेवटी महत्त्वपूर्ण असा त्यांचा संवाद होतो. ( ३ ) तिसऱ्या सर्गांत दिलीपराजाच्या सुदक्षिणा राणीला पुत्ररत्न होते. त्याचें नांव 'रघु' असें ठेवतात. नंतर

त्याला राज्याभिषेक करतात वगैरे वर्णन आहे. (४) चौथ्या सर्गांत रघुराजाच्या दिग्विजयाचें वर्णन आहे. (५) पांचव्या सर्गांत १ कौत्साच्या गुरुदक्षिणेबद्दलची माहिती आहे. २ विदर्भ देशाचा राजा क्रथकैशिक हा अज राजाला आपल्या इंदुमती नांवाच्या बहिणीच्या स्वयंवराकरितां आमंत्रण पाठवितो व नंतर अज राजा तिकडे जातो त्याचें वर्णन आहे. (६) साहव्या सर्गांत इन्दुमतीच्या स्वयंवराचें वर्णन आहे. (७) सातव्या सर्गांत इन्दुमती अज राजाला वरते त्याचें वर्णन आहे. (८) आठव्या सर्गांत इंदुमतीच्या मृत्यु बद्दल अजराजाच्या शोकाचें वर्णन आहे. (९) नवव्या सर्गांत दशरथ राजा शिकारीला जातो व चुकून त्याच्या हातून तमसा नदीवर अंधळ्या आई-वडिलांना तीर्थयात्रेसाठीं घेऊन जात असतां वाटेंत त्यांस तहान लागल्यामुळें पाणी नेणारा श्रावण मारला जातो. ती बातमी ऐकून श्रवणाचे मातापितरांनीं ' त्वं पुत्रशोकं करीत मरशील ' असा दशरथास शाप दिला. (१०) दाहव्या सर्गांत रामावतार वर्णन आहे. (११) अकराव्या सर्गांत सीताविवाह वर्णन आहे. (१२) बाराव्या सर्गांत रावणाच्या वधाचें वर्णन आहे. (१३) तेराव्या सर्गांत रामादिकांचे दंडकारण्याकडे परत येणे. (१४) चौदाव्या सर्गांत रामानें केलेल्या सीतात्यागाचें वर्णन आहे. (१५) पंधराव्या सर्गांत रामाच्या स्वर्गगमनाचें वर्णन आहे. (१६) सोळाव्या सर्गांत कुमुद्वतीच्या लग्नाचें वर्णन आहे. (१७) सतराव्या सर्गांत 'अतिथि' नांवाच्या नातवाचे (कुशपुत्राचे) वर्णन आहे. (१८) आठराव्या सर्गांत रामाच्या वंशानुक्रमाचें वर्णन आहे. (१९) एकोणिसाव्या सर्गांत 'अग्निवर्ण' नांवाच्या राजाच्या शृंगाराचें वर्णन आहे.

## रघुवंशवृक्ष

| मुख्य पुरुष व | त्याची पत्नी |
|---|---|
| १ दिलीप | १ सुदक्षिणा |
| २ रघु | |
| ३ अज | ३ इंदुमति |
| ४ दशरथ | ४ कौसल्या, कैकेयी, सुमित्रा |
| ५ राम | ५ सीता |
| ६ कुश ( लव ) | ६ कुमुद्वती |
| ७ अतिथि | ७ निषधा |

नंतरचे वंशज-८ निषध. ९ नळ. १० नभ. ११ पुंडरीक. १२ क्षेमधन्वा. १३ देवानीक. १४ अहीनगू. १५ पारियात्र. १६ शिल. १७ उन्नाभ. १८ वज्रनाभ. १९ शंखण. २० व्युषित. २१ विश्वसह. २२ हिरण्यनाभ. २३ कौसल्य. २४ ब्रह्मिष्ठ. २५ पुत्र. २६ पुष्य. २७ ध्रुवसंधि. २८ सुदर्शन. २९ अग्निवर्ण.

### रघुवंशांतील सुभाषितें

**स्वामिनिष्ठा**—ज्या वस्तूचें रक्षण करणें आपल्यावर सोपवून दिलें आहे अशा वस्तूचा नाश होऊं देऊन स्वतः कोणतीच झीज न सोसतां मालकापुढें उभे राहणें योग्य नाही.

स्थातुं नियोक्तुर्नहि शक्यमग्रे विनाश्य रक्ष्यं स्वयमक्षतेन।
सर्ग २. श्लोक ५६.

**तेज**—भगवान सूर्यनारायण हा प्रकाशमान असतांना लोकांच्या दृष्टीला प्रतिबंध करण्यास अंधार कसा बरें समर्थ होईल !

सूर्ये तपत्यावरणाय दृष्टेः कल्पेत लोकस्य कथं तमिस्रा। सर्ग, ५ श्लोक १३

**सोन्याचीपरीक्षा—** सोन्याची शुद्धता किंवा हिणकसपणा अग्नींत तापवल्यामुळें कळतो.

हेम्नः संलक्ष्यते ह्यग्नौ विशुद्धिः श्यामिकापि वा।

सर्ग १ श्लोक १०

**भाषांतर—**मराठी श्री. रा. ग. बोरवणकर, किं. ३ रु. ८ आणे.
इंग्रजी– १ एम्. आर. काळे, २ नंदर्गीकर, ३ जोगळेकर.

---

## कुमार संभवपरिचय

**कर्ता — कालिदास– सर्ग–१७** ( पैकीं पहिले आठ कालिदासाचे अशी दंतकथा आहे.

१ पहिल्या सर्गांत हिमालयाचें वर्णन, व पार्वतीच्या जन्माचें वर्णन आहे. २ दुसऱ्या सर्गांत 'तारकासुर' नावाच्या राक्षसामुळें त्रासलेले इंद्रादिक देव महादेवाला शरण जातात व महादेव 'मदनाला वश करून घे' असें इंद्राला सांगतो. ३ तिसऱ्या सर्गांत इंद्राच्या सांगण्यावरून मदन हा दर्शनाला येणाऱ्या पार्वती विषयीं शंकराच्या मनांत कामबुद्धि उत्पन्न करतो परंतु शंकर चोहोंकडे कोपरूपी अग्नीची दृष्टि फिरवितो. ती दृष्टि मदनावर पडून त्याची तेथेंच राख होते. ४ चौथ्या सर्गांत मदनाची स्त्री ' रति ' हिच्या शोकाचें वर्णन आहे. ५ पांचव्या सर्गांत पार्वतीच्या तपाचें वर्णन आहे. ६ साहव्या सर्गांत पार्वती-प्रदान. ७ व्या सर्गांत पार्वतीच्या लग्नाचें वर्णन आहे. ८ व्या सर्गांत विलासाचें (सुरत) वर्णन आहे. ९ व्या सर्गांत शंकर-पार्वती याच्या कैलास पर्वतावरील विहाराचें वर्णन आहे. १० व्या सर्गांत ' कार्तिकेय' याच्या जन्माचें वर्णन आहे. ११ व्या सर्गांत कार्तिकेयाचें वर्णन.

१२ व्या सर्गांत देव तारकासुराला मारण्यासाठीं कार्तिकेयाला सेनापती करतात त्याचें वर्णन. १३ व्या सर्गांत कुमार सैनापत्याभिषेकाचें वर्णन आहे. १४ व्या सर्गांत देवसेनाप्रयाणवर्णन आहे. १५ व्या व १६ व्या सर्गांत देव व असुर यांचे युद्ध. १७ व्या सर्गांत तारकासुराच्या वधाचें वर्णन आहे.

**रत्नाचें माहात्म्य**— 'रत्न' हें आपणहून गिऱ्हाइकाला शोधीत नाहीं. तर गिऱ्हाइकाकडूनच तें शोधिलें जातें.

न रत्नमन्विष्यति मृग्यते हि तत् । सर्ग ५ श्लोक ४५

**स्तुति**–स्तुति कोणाला संतुष्ट करणार नाहीं ( सर्वांनाच संतुष्ट करील )

स्तोत्रं कस्य न तुष्टये । सर्ग १० श्लोक ९

**श्रेष्ठांची संगत**–श्रेष्ठ माणसाची संगत कोणाला पराक्रम करण्याला प्रवृत्त करणार नाहीं ? ( सगळ्यांनाच प्रवृत्त करील )

न कस्य वीर्याय वरस्य संगतिः । सर्ग १६ श्लोक ५१

**योग्य पति**— चांगल्या नवऱ्याला दिलेली कन्या वडिलांना शोक उत्पन्न करणारी नसते.

अशोच्या हि पितुः कन्या सद्भर्तृप्रतिपादिता । सर्ग ६ श्लोक ७१.



## किरातार्जुनीय परिचय

हें काव्य 'भारवि' नांवाच्या कवीनें केलेलें आहे यांत १८ सर्ग आहेत.

**सर्ग**– १ या सर्गांत दुर्योधनाचा राज्यकारभार कसा चाललेला आहे व त्याची प्रजेशीं वागणूक कशी आहे हें जाणण्याकरितां पांडवांनीं नेमलेला दूत प्रत्यक्ष ठिकठिकाणीं हिंडून पाहिलेलें दुर्योधनाचें राजनी-

तीच्या बाबतींतलें नैपुण्य धर्मराजाला सांगतो, त्याचें वर्णन आहे. नंतर द्रौपदी आपल्या वाईट परिस्थितीचा विचार करून धर्मराजाला राग. येऊन तो परिस्थिती सुधारील असें भाषण करते त्याची माहिती आहे. २ या सर्गांत 'भीम' हा द्रौपदीनें परिस्थितीबद्दल केलेलें भाषण ऐकून धर्मराजाला असें म्हणतो कीं 'हीन दर्जाच्या माणसाजवळ संपत्ति राहते' अशी आपल्या विषयीं लोकांत अपकीर्ति होईल म्हणून संपत्ति आपल्या शत्रूकडे दुर्लक्ष करणाऱ्या राजाजवळ राहात नाहीत. अशा रीतीचा संवाद होतो, त्याची माहिती आहे. ३ या सर्गांत (१) व्यास महर्षींचें वर्णन. (२) धर्मराज व व्यास या दोघामध्यें झालेल्या संभाषणाचें वर्णन. (३) अर्जुनाला व्यासांनी केलेला विद्येचा उपदेश व तपश्चर्या करण्याची आज्ञा (४) अर्जुनाचें तपश्चर्येला जाणें. (५) अर्जुनाच्या ताटातुटीमुळे पांडवांना होणारें दुःख. (६) द्रौपदीचा अर्जुनाला निरोप. (७) व्यासाच्या आज्ञेमुळें गुह्यकाबरोबर अर्जुनाचें हिमालयाच्या इद्रकील नावाच्या पर्वतावर जाणें. ही माहिती आहे. ४ या सर्गांत भारवि कवि व गुह्यक यांचे शरदृतूचें वर्णन आहे ५ या सर्गांत हिमालयाचें वर्णन आहे ६ या सर्गांत (१) इद्रकील पर्वतावर अर्जुन कसा चढतो, त्याचें वर्णन व तेथील अर्जुनाच्या तपश्चर्येचें वर्णन. (२) इद्रकील पर्वताच्या संरक्षकांनी इंद्राच्याकडे जाऊन अर्जुनाच्या तपश्चर्येचें केलेलें वर्णन. (३) इंद्राची अप्सरांना (स्वर्गांतील सुंदर स्त्रिया) अर्जुनाच्या तपश्चर्येंत विघ्न उत्पन्न करण्यासाठीं झालेली आज्ञा. ७ या सर्गांत (१) गंधर्व व अप्सरा यांचें अर्जुनाच्या तपश्चर्येंत विघ्न करण्याकरिता जाण्याचें वर्णन (२) त्याचप्रमाणे शिबिराचें वर्णन. ८ या सर्गांत गंधर्व व अप्सरा यांचे फुलें वेंचण्याचें व जल-

संवाद. ( २ ) अर्जुनाचें भिल्लरूपधारी शंकराच्या सैन्याशीं झालेल्या युद्धाचें वर्णन आहे. १५ या सर्गांत चित्रयुद्ध वर्णन आहे. १६ या सर्गांत भिल्लरूपधारी शंकराचें युद्धांतील नैपुण्य पाहून अर्जुनाचा तर्कवितर्क. नंतर अर्जुन व भिल्लरूपधारी शंकर यांच्यांत झालेल्या अस्त्रयुद्धाचें वर्णन आहे. १७ या सर्गांत पुनः झालेल्या युद्धाचें वर्णन आहे. १८ या सर्गांत (१) अर्जुन व भिल्लरूपधारी शंकर या दोघांत झालेल्या बाहुयुद्धाचें वर्णन.(२) नंतर अर्जुनावर शंकराची कृपादृष्टि होते. व शेवटीं शंकर आपल्या खऱ्या स्वरूपांत प्रगट होतो. (३) पुढें तेथें इंद्रादिक देवांचें आगमन होतें. (४) अर्जुन शंकराची स्तुति करतो व वर मागतो. (५) शंकरानें अर्जुनाला केलेल्या धनुर्वेदाच्या उपदेशाचें वर्णन आहे. (६) शंकराच्या आज्ञेमुळें इंद्रादिक देवांनीं अर्जुनाला दिलेले वर व दिलेलीं अस्त्रें यांचें वर्णन आहे. (७) अर्जुन कृतकृत्य झाल्यावर केवळ शंकराच्या आज्ञेमुळें पुनः परत धर्मराजाकडे जातो त्याचें वर्णन.

## किरातार्जुनीय काव्यांतील सुभाषितें

**नीच संगति त्याज्य**—आपली उन्नति इच्छिणाऱ्या माणसानें नीच माणसाच्या संगतीपेक्षां गुणवान् अशा मोठ्या माणसाशीं वैर केलेलेंही चांगलें. (ससुहृत्वम्भूतिमनार्यसंगमाद्वरं विरोधोऽपि समं महात्मभिः।:)

सर्ग १ श्लोक ८.

**विचार व अविचार ह्यांचा परिणाम**—मनुष्यानें विचार न करितां कोणतेंही काम करूं नये. अविचार मोठ्या विपत्तींचें ठिकाण आहे. गुणाविषयीं लोभी असलेल्या अशा संपत्ति विचारपूर्वक उद्योग करणाऱ्यालाच आपण होऊन वरीतात.

ते नष्ट केलेल्या अशा माणसापेक्षां अजिबात अंगीं गुण नसलेला मनुष्यच चांगला. बसविलेलें रत्न नाहिंसें झालेल्या दागिन्यापेक्षा अगोदर रत्न न बसविलेलाच दागिना चांगला.

वरं कृतध्वस्तगुणादत्यन्तमगुणः पुमान् ।
प्रकृत्या ह्यमणिः श्रेयान्नालङ्कारश्च्युतोपलः ॥ सर्ग १५ श्लोक १५

भाषांतर–मराठी– १ ते ७ गोरेशास्त्रीकृत. इंग्लिश– १ ते ३ सर्ग, काळेकृत. १ ते २ सर्ग पाटणकरकृत. १ ते १० पागारकरकृत. जर्मन– प्रो. कार्लकॅपेलरकृत संपूर्ण भाषांतर.

## शिशुपालवध-परिचय.

हें काव्य महाभारतांतील सभापर्वांतल्या 'शिशुपालवध' या कथेला धरून माघ नांवाच्या कवीनें रचिलें आहे. सर्ग १ या सर्गांत द्वारकेंत नारद येतो व श्रीकृष्णाला इंद्राचा संदेश सांगतो त्याचें वर्णन आहे. २ या सर्गांत उद्धव, बलराम, व श्रीकृष्ण यांच्या मसलतीचें वर्णन आहे. ३ या सर्गांत श्रीकृष्णाचें द्वारकेंतून प्रस्थानाचें वर्णन. द्वारका व समुद्र यांचें वर्णन आहे. ४ या सर्गांत रैवतक पर्वताचें वर्णन आहे. ५ या सर्गांत स्कन्धावार संनिवेशादि वर्णन आहे. ६ या सर्गांत सहा ऋतूंचें (वसंत, ग्रीष्म, वर्षा, शरद्, हेमंत, शिशिर) वर्णन आहे. ७ या सर्गांत पुष्पावचय वर्णन आहे. ८ या सर्गांत जलक्रीडेचें वर्णन आहे. ९ या सर्गांत संध्याकाळच्या चंद्रोदयाचें वर्णन आहे. १० या सर्गांत पानगोष्ठी वर्णन व रात्रिक्रीडावर्णन आहे. ११ या सर्गांत प्रभात वर्णन आहे. १२ या सर्गांत प्रयाणाचें व यमुना नदीचें वर्णन आहे. १३ या सर्गांत (१) श्रीकृष्ण व पांडव यांच्या भेटीचें वर्णन. (२)

सामानाधिकरण्यं हि तेजस्तिमिरयोः कुतः ।

**स्वार्थ**– सर्वांचा आपल्या हिताकडे ओढा असतो.

सर्व. स्वार्थं समीहते । २–६५

भाषांतरः– मराठी १ सर्ग गोरेशास्त्रीकृत. इंग्लिश– १ ते ४ सर्ग. नेरूरकर, पाटणकर.

---

## नैषध परिचय

**परिचय**— धर्मराज भावासमवेत वनवासात असता बृहदश्वनामे त्याच्या समाचाराला गेले. तेव्हा 'माझ्यासारखा दुःखी या जगात कोणी होऊन गेलेला आहे काय ?' असें विचारलें तेव्हा ऋषींनें त्याला 'नलराजाची **गोष्ट**' सांगितली. ही गोष्ट महाभारत वनपर्व अध्याय ५० ते ७७ मध्यें आहे. [एकूण २८ अध्यायात] ५० ते ५४ या अध्यायामध्यें दमयंतीच्या स्वयंवरापर्यंतचें नैषधाचें पूर्वचरित्र आहे. नंतरच्या ५५ ते ७७ या अध्यायामध्यें नैषधाचें उत्तरचरित्र आहे. या महाभारतांतील नळकथेच्या आधारानेच श्रीहर्षानें '**नैषधचरित**' रचिलें आहे.

**सर्ग**—यांत २२ सर्ग आहेत. १ ते १६ सर्गांत नैषधाचें पूर्वचरित सांगितलें असून बाकीच्या सर्गांत नैषधचरिताचा उत्तरभाग सांगितला आहे. यामध्यें शब्दांच्या अनेक प्रकारच्या कोटया व सामान्यपदें योजून विविध अर्थांची स्फूर्ति करणारे श्लेषालंकार व उपमा, रूपक, दृष्टांत वगैरे अलंकार आहेत. या काव्यांत मुख्यतः शब्दार्थचमत्कृतिपोष उत्तम साधला आहे. श्रीहर्षानें जाणून बुजून या काव्यास पडितरम्यता आणली आहे. त्याचें कारण स्वतः यानें उपसंहार श्लोक ४ मध्यें सांगितलें आहे. तें असें—ग्रंथि पठित ' शास्त्रीय विचार-

प्रमाणें काव्यांत विचार करण्यासारखें काय आहे?' अशी काव्या-विषयीं अनादर बुद्धि व्यक्त करतात तेव्हां अशा पंडितांच्या बुद्धीची घमेंड दूर व्हावी म्हणून काव्याची क्लिष्टरचना केली आहे.

## नलदमयंती—आख्यान

**कथानक**—भीमराजाची **दमयंती** नांवाची मुलगी लग्न करण्याला योग्य अशी झाली होती. ती दरबारांत आपल्या बापाजवळ बसली असतां लांबच्या देशांतून ब्राह्मण तेथें आले आणि त्यांनीं भीमराजापुढें नलराजाचे गुण व रूप या बाबतींत अत्यंत स्तुति केली, ती स्तुति ऐकून दमयंतीनें नलराजालाच नवरा करण्याचा निश्चय केला. इकडे भीमराजाच्या नगरींत नलराजाचे दूत होते, त्यांनीं अत्यंत सुंदर अशा दमयंतीचें तुझ्यावर प्रेम बसले आहे अशी नलराजाला बातमी सांगितली. तेव्हां त्याला चैन पडेना. शेवटीं तो शिकारीला निघाला, तो वाटेंत त्याला एक बाग लागली. त्यांतील एका सरोवरांत सोनेरी रंगाचे राजहंस क्रीडा करीत होते. त्यांपैकीं एक **राजहंस** दमून कांठावरच निजला होता. त्याला नलराजानें हळूच पुढें होऊन धरलें. हंसानें सुटून जाण्याचा खूप प्रयत्न केला. राजाची दया भाकून त्याचें मन वळविण्याचा प्रयत्न केला. शेवटीं कठोर शब्दांत त्याची कानउघाडणी करताच व राजाच्या कर्तव्याची तद्वत् प्राणिमात्रांच्या करमणुकीची गोष्ट बोलतांच नलराजानें त्या हंसाला सोडून दिलें. नंतर हंस मनांत कृतज्ञता बाळगून पुनः नलराजापुढें आला व त्याला असें म्हणाला कीं—'हे नलराजा, तूं विरही आहेस, तेव्हां **'तुला तुझ्या सारखी सुंदर नायको मिळवून देऊं कां?'** नलराजाच्या मनांतील

गोष्ट हंस बोलल्यामुळें दमयंतीचें मन आपल्याकडे वळविण्याच्या कामासाठीं त्यानें भीमराजाच्या नगरीकडे हंसाला धाडलें. हंस तिकडे गेला व आपल्या मैत्रिणीबरोबर खेळणाऱ्या दमयंतीचें मन हंसानें आपल्याकडे घेतलें नंतर हंसानें दमयंतीला एका बाजूस नेऊन नलराजाला वरण्याबद्दल तिचें मन अनुकूल करून घेतलें—व आपलें कर्तव्य पार पाडल्याचें नलराजाला परत येऊन सांगितलें. हंसाच्या सांगण्यामुळें दमयंतीला चैन पडेनासें झालें. नंतर तिचा आजार औषधानें बरा होण्यासारखा नाहीं, हें तिच्या आईनें ओळखून भीमराजाला ती सर्व हकीगत कळविली पुढें भीमराजानें दमयंतीच्या स्वयंवराचा बेत केला व देशोदेशींच्या राजेलोकांना स्वयंवराला येण्याचीं निमंत्रणें धाडलीं. इकडे नारद हिंडत हिंडत देवलोकांतील इंद्राच्या सभेंत गेले, तेव्हां त्यांना इंद्रानें 'पृथ्वीवरील बातमी काय आहे' तें विचारलें सौंदर्याच्या बाबतींत अप्सरांना भारी असलेल्या अशा दमयंतीच्या स्वयंवराची तयारी चाललेली असून सर्व राजेलोक त्या तयारींत आहेत म्हणून सांगितलें. तें ह्या इंद्राच्या मनांत दमयंती आपल्याला मिळावी अशी इच्छा झाली. इंद्र, वरुण, यम, अग्नि, असे चार देव भीमराजाच्या नगरीकडे निघाले रस्त्यांत त्यांना नलराजा भेटला. नलराजाचें सौंदर्य पाहून दमयंती नलराजालाच वरेल, आपल्याला वरणार नाहीं अशी इंद्राची खात्री झाली म्हणून त्यानें नलराजाला 'आपल्याला दमयंतीनें वरावें' हें काम करण्यास सांगितलें 'कोणी याचना केली तर त्याला नाहीं म्हणावयाचें नाहीं' असा नलराजाचा बाणा असल्यामुळें त्यानें दमयंतीला इंद्राचा निरोप सांगितला. परंतु दमयंतीनें 'आपण नलराजालाच वरणार' असा आपला दृढ निश्चय स्पष्टपणें कळविला.

नंतर स्वयंवराच्या मंडपांत सगळे राजे जमा झाले असतां त्यांना वगळून नलराजाच्या गळ्यांतच दमयंतीनें माळ घातली व देवांच्या चौकडीला राग येऊं नये म्हणून **'आपण माझ्या वडिलांच्या सारखे आहात.'** म्हणून **नलराजाचें हातावर माझे कन्यादान करावें** अशी प्रार्थना केली. शेवटीं नलराजा व दमयंती ह्यांचें लग्न होऊन चोहोंकडे आनंदी आनंद झाला.

---

## नैषधांतील सुभाषितें

**सज्जनस्वभाव**— सज्जन लोक आपल्या तोंडानें आपला उपयोग न सांगता कार्याच्या सिद्धीनेच उपयोग सांगतात.

ब्रुवते हि फलेन साधवो न तु कुण्ठेन निजोपयोगिताम्।

सर्ग २, श्लोक ४८

सज्जनांचा दुसऱ्याला उपयोगी पडण्याचा गुण स्वाभाविक असतो.

स्वत एव सतां परार्थता। सर्ग ६, श्लोक ६१

**संसर्ग**— पित्तामुळें जीभ दूषित झाली असतां साखरसुद्धां कडू लागते.

पित्तेन दूने रसने सितापि तिक्तायते हंसकुलावतंस।

सर्ग ३, श्लोक ९४

**भाषांतर-इंग्लिश**— प्रो. हन्डिक. संपूर्ण भाषांतर किं. १२ रु.

**मराठी**— तळेकरकृत, फक्त पहिला सर्ग.

### पंचमहाकाव्यें

| काव्य | कर्ता | सर्ग | टीका | टीकाकार |
|---|---|---|---|---|
| १ रघुवंश | कालिदास | १९ | संजीविनी | मल्लिनाथ |
| २ कुमारसंभव | कालिदास | ८ | संजीविनी | मल्लिनाथ |

३ किरातार्जुनीय भारवि १८ घंटापथव्याख्या मल्लिनाथ
४ शिशुपालवध माघ २० सर्वंकषा मल्लिनाथ
५ नैषधीयचरित् श्रीहर्ष २२ प्रकाश नारायण
मल्लिनाथ टीका सर्ग १–१२

### इतरकाव्यें

| काव्य | कर्ता | काव्य | कर्ता |
|---|---|---|---|
| १ ऋतुसंहार | कालिदास | ४ बुद्धचरित | अश्वघोष |
| २ मेघदूत | कालिदास | ५ गीतगोविंद | जयदेव |
| ३ भर्तृहरिशतकत्रय | भर्तृहरि | ६ गंगालहरी | जगन्नाथ |
| (१ नीतिशतक, २ शृंगारशतक | | ७ भट्टिकाव्य | भट्टि |
| ३ वैराग्यशतक ) | | ८ सेतुबंधमहाकाव्य | प्रवरसेन |
| | | ९ सौन्दरानंद | अश्वघोष |

### विडंबनकाव्यें

| काव्य | कर्ता | काव्य | कर्ता |
|---|---|---|---|
| १० पानदूत | कै. सहस्रबुद्धे | १२ कलिवृत्तादर्श | याटने |
| ११ चहागीता | कै. सहस्रबुद्धे | १३ कलिविडंबन | दीक्षित |
| | | १४ कलिप्रभाव | गोविंदशास्त्री |

---

## कविपरिचय

### व्यास

पिता–पराशर. माता–सत्यवती.

कार्य–१ द्वापरयुगांत भगवानानें व्यासाच्या रूपानें अवतार घेऊन वेदाचे ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्ववेद, असे चार भाग केले. कारण

लोक आळशी, अल्पायु, मंदबुद्धीचे, पापरत झाले होते. २ उपनिषद्-तात्पर्यासाठी ब्रह्मसूत्रें केलीं. ३ स्त्री-शूद्रांकरितां महाभारत केलें. अठरा पुराणें रचून कर्म, उपासना, ज्ञान यांचा विस्तार केला. विशेष—व्यासोच्छिष्टं जगत् सर्वम्।

## वाल्मीकि

**नांव** —वाल्मीकि अथवा आदिकवि. 'प्राचेतस्' ह्या नांवानें संस्कृतवाङ्मयांत उल्लेख येतो. **जात**—ब्राह्मण. **बालपण**—वाल्मीकि लहान असतांच त्याला त्याच्या आई-वडिलांनीं अरण्यांत तपश्चर्येकरितां जातांना सोडून दिलें. नंतर वाल्मीकि भिल्लांच्या हातीं लागला व त्यांच्या संगतीमुळें धनुर्विद्येंत निष्णात होऊन चोरी-वाटमारीचा धंदा करूं लागला. एके वेळीं त्याची एका मोठ्या ऋषीशीं भेट घडून त्यानें **'तुझी बायकामुलें तुझ्या पापकर्मांचा वांटा घेणार नाहींत'** असें सांगितलें. ह्या वाक्यावर वाल्मीकीचा विश्वास बसल्यावर तो विरक्त झाला. नंतर त्या ऋषीच्या उपदेशावरून त्यानें शरिरावर वारूळ ( वल्मीक ) वाढेपर्यंत 'मरा ( **राम** ह्या शब्दाच्या उलट ) या शब्दाचा जप ( नामस्मरण ) केला, म्हणून त्याला वाल्मीकि किंवा वाल्मीक असें नांव पडलें. व तो मोठ्या ऋषींच्या कवीच्या पदवीला चढला.

### रामायण ग्रंथाची उत्पत्ति

तमसा ( हल्लीं तिला 'तानसा' म्हणतात व ती रेवा प्रांतात आहे. ) नांवाच्या नदीच्या कांठीं वाल्मीकीचा आश्रम होता. एकदा वाल्मीकि तमसा नदींत स्नान करून तीरावरील अरण्यांत हिंडत असतां त्यानें

एका झाडावर बसलेलें क्रौंच पक्ष्याचें एक जोडपें पाहिलें. इतक्यांत एका पारध्यानें बाण मारून त्या क्रौंच पक्ष्याच्या जोड्यापैकीं नराला खालीं पाडलें. मरत असतांना त्या नरानें केलेली तडफड व मादीचा आक्रोश आणि दीन मुद्रा पाहून वाल्मीकीचें मन विरघळलें. व डोळ्यांतून सारखे अश्रू वाहूं लागले व मनाचा संतापही भयंकर झाला. शोक व क्रोध यांच्या संमिश्र भावना पुढील श्लोकाच्या द्वारें त्याच्या मुखांतून बाहेर पडल्या—

> मा निषाद प्रतिष्ठां त्वमगमः शाश्वतीः समाः।
> यत्क्रौञ्चमिथुनादेकमवधीः काममोहितम् ॥१॥
>
> रामायण, बालकांड २–१५ व उत्तररामचरित्र अंक २. श्लोक ५

अर्थ—हे निषादा ! ज्या अर्थी क्रौंच पक्ष्याच्या जोडप्यापैकीं काम-मोहित झालेल्या नराचा तूं वध केला आहेस त्या अर्थी तुला चिरकाळ मुक्ती मिळणार नाहीं.

**ब्रह्मदेवाचा आशीर्वाद**—ब्रह्मदेवानें वाल्मीकिला असा आशीर्वाद दिला कीं—'जोंपर्यंत ह्या पृथ्वीतलावर पर्वत उभे आहेत व नद्या वाहात आहेत तोंपर्यंत 'रामायणकथा' लोकांत प्रचलित राहील—

> यावत्स्थास्यन्ति गिरयः सरितश्च महीतले।
> तावद् रामायणकथा लोकेषु प्रचरिष्यति।
>
> ( रामायण, बालकांड २–३७ )

लोकांचीं मनें राखण्यासाठीं रामानें सीतेचा त्याग करून तिला वनांत पाठविलें. त्या वनांत वाल्मीकि ऋषि राहत होते. दुःखी, निराश अशा सीतेला पाहून तिची सर्व हकीगत ऐकून घेऊन वाल्मीकीनें तिला आपल्या आश्रमांत ठेवून घेऊन आश्रय दिला. नंतर तेथेच

सीता प्रसूत होऊन कुश आणि लव नांवाच्या जुळ्या मुलांना जन्म देती झाली. वाल्मीकीनेंच त्या मुलांना सर्व प्रकारचें शिक्षण दिलें आणि त्यांना स्वतः रचलेलें रामायण शिकविलें. कुश आणि लव ह्या दोघांनीं आपल्या आईला वडिलांची पद्यमय हकिकत गाऊन दाखविली. नंतर रामानें ' **अश्वमेघ** ' नांवाचा यज्ञ सुरू केला. वाल्मीकीनें कुश–लवांना रामाकडे नेलें आणि कुश–लवांच्याकडून त्याला रामायण गाऊन दाखविलें. तें ऐकून सर्व लोकांची चित्तवृत्ति तल्लीन होऊन त्यांच्या डोळ्यांतून आनंदाश्रु वाहूं लागले. ह्याचें वर्णन बालकांड ४ सर्गांमध्यें आहे.

---

## कालिदास

[ इ. स. पूर्व १ शतक ]

कालिदासाला संस्कृत कवींच्या मालिकेंत ' **कविकुलगुरु** ' महाकवि, असें म्हणतात. तद्वत् नाटककारांतहि त्यास मान देतात.

**वैशिष्ट्य**—पूर्वी कोणी एक पंडित आजपर्यंत किती कवि झाले म्हणून मोजूं लागला; तेव्हां प्रथम कालिदासाच्या नांवानें त्यानें करंगळी घातली; परंतु पुढें पाहूं लागला तो दुसरें बोट घालण्यास त्याला दुसरा कवि सांपडेना. तेव्हां त्या बोटाचें नांव जें ' अनामिका ' (नांव नसलेलें बोट) तें सार्थ झालें आहे.

[संस्कृतमध्यें हाताच्या बोटांना पुढीलप्रमाणें नांवें आहेत:— १ अंगुष्ठ (आंगठा). २ तर्जनी (धाक दाखविण्याचें बोट). ३ मध्यमा ( मधलें बोट. ) ४ अनामिका ( नांव नसलेलें बोट. ) ५ कनिष्ठिका ( सर्वांत लहान बोट ).

पुरा कवीनां गणनाप्रसङ्गे कनिष्ठिकाऽधिष्ठितकालिदासः ।
अद्यापि तत्तुल्यकवेरभावादनामिका सार्थवती बभूव ॥

कालिदास is the Shakespeare of India

*Sir William Jones.*

**गुण—** कालिदासाची उपमा, **भारवी** कवीचे अर्थगौरव, **दण्डि** कवीचे पदलालित्य ( शब्दांची डुमदार रचना ). परंतु **माघ** कवीच्या एकट्याच्या ठिकाणीं हे तीन गुण आहेत.

उपमा कालिदासस्य भारवेरर्थगौरवम् ।
दण्डिनः पदलालित्यं माघे सन्ति त्रयो गुणाः ॥

**ग्रंथ—** काव्य १ रघुवंश. २ कुमारसंभव. ३ ऋतुसंहार. ४ मेघदूत.
**नाटकें—** १ अभिज्ञानशाकुंतल. २ मालविकाग्निमित्र. ३ विक्रमोर्वशीय.

' कालिदास ' ह्या कविकुलगुरूची माहिती देणारी पुस्तकें.

**मराठी—** श्री. के. ल. ओगलेकृत 'कविकुलगुरु कालिदास'; प्रो. वा. नि. मिराशी, महामहोपाध्याय नागपूर. 'कालिदास'; गु. प. रंगाचार्य रड्डी यांचा लेखसंग्रह मर्यादित ' कालिदास; ' कै. विष्णुशास्त्री चिपळूणकरांचे ' संस्कृत कविपंचक. '

**इंग्लिश** -Beauties from Kalidas or कालिदास सूक्ति मञ्जूषा by केदारनाथ अण्णा पाध्ये, वकील. मुंबई. किं. १ रु. ८ आणे.

## कालिदासाच्या आख्यायिका

**१ मूर्खा ये—** एके दिवशीं भोजराजा आपल्या राणीच्या महालांत गेला. त्या वेळीं ती आपल्या मैत्रिणींशीं गप्पा मारीत बसली होती. राजाला पाहून ' **मूर्खा ये** ' असें म्हणाली. तें ऐकून राजा तेथून परत आला आणि दरबारांत येऊन बसला. आणि जो जो कोणी

दरबारांत येईल त्याला ' मूर्खा ये ' असें म्हणत होता. परंतु कोणीहि त्याला उत्तर दिलें नाहीं. सर्व लोक विचार करूं लागले कीं आज राजाला काय झालें आहे ? हा सगळ्यांना मूर्ख कां म्हणतो ? इतक्यांत कालिदास आला तेव्हां भोजराजानें त्यास ' मूर्खा ये ' असें म्हटलें, त्यावर कालिदासानें त्याला उत्तर दिलें—

खादन्न गच्छामि हसन्न जल्पे गतं न शोचामि कृतं न मन्ये ।
द्वाभ्यां तृतीयो न भवामि राजन् किं कारणं भोज भवामि मूर्ख ॥६॥

**अर्थः**— मी रस्त्यांतून खात खात जात नाहीं. हसत हसत बोलत नाहीं. गेलेल्या वस्तूचा शोक करीत नाही. जेथें दोन लोक आहेत (बोलत आहेत) तेथें मी तिसरा असत नाहीं. तेव्हां हे राजा मी कोणत्या कारणास्तव मूर्ख आहे ? तें ऐकून राणीनें आपल्याला मूर्ख कां म्हटलें ते जाणलें.

दासानें 'मी आहे, असे सांगितले. तेव्हां शिष्य त्यास म्हणाला आणखी तीन कोळी घेऊन ये नंतर कालिदास तीन कोळ्याना घेऊन तेथें आला पुढें गुणनिधिपंडिताची पालखी कोळिरूपधारी कालिदासादि चौघानीं सर्व नगरात फिरवून मुक्कामाकडे आणली तेव्हा गुणनिधि पंडितानें कोळ्याना विचारिलें कीं-हे पालखी वाहणाऱ्यानो, ह्या पालखीच्या दांड्यामुळे तुम्हाला क्लेश झाले काय?

अयमान्दोलिकादण्डः स्कन्धे (न्धं) किं तव बाधति ।
न तथा बाधते दण्डो यथा बाधति बाधते ॥

पालखीच्या दांड्याने क्लेश झाले नाहींत परंतु आपल्या तोंडातून 'बाधते' ह्या शुद्ध क्रियापदाऐवजी 'बाधति' असें अशुद्ध क्रियापद ऐकून फार क्लेश झाले. हे ऐकून गुणनिधिपंडिताला आश्चर्य वाटून त्यानें तुझ्यासारख्या कोळ्याला हें ज्ञान कसें प्राप्त झाले? कोळ्याचें रूप धारण केलेल्या कालिदासाने सांगितले कीं-आपल्या सारख्या पंडिताच्या सहवासानें मला थोडेसें ज्ञान प्राप्त झाले. गुणनिधिपंडितानें विचारलें कीं कोणत्या पंडिताच्या सहवासामुळें तुला ज्ञान प्राप्त झालें. येथील 'कालिदास' नावाच्या पंडितामुळें. नंतर गुणनिधीनें विचार केला कीं, ज्याच्या सहवासातला कोळी विद्वान आहे, तर प्रत्यक्ष तो किती विद्वान असेल बरें? तेव्हा अशा विद्वानाचा आपल्याला कसा पराभव करता येईल?

## भारवि

'भारवि' कवीचा जीवनवृत्तांत उपलब्ध नाही. दण्डि कवीच्या पणज्याचा भारवि मित्र होता. दक्षिणेकडचा राहणारा, चालुक्य वंशातील विष्णुवर्धन नावाच्या राजाचा सभापण्डित. काल इ. स. पू. ६००.

ग्रंथ— किरातार्जुनीय काव्य.

१ आख्यायिका—'भारवि' हा अत्यंत बुद्धिमान्, विद्वान्, व्यासंगी होता. परंतु त्याचे वडील त्याला नेहमीं 'तूं मूर्ख आहेस, आळशी आहेस' वगैरे म्हणत असत. त्यामुळें त्याला वडिलांचा फार राग येत असे. एके दिवशीं त्याच्या मनांत असा विचार आला कीं 'मी एवढा उद्योग, व्यासंग करीत असतांनाही वडील मला प्रोत्साहन न देतां उलट हिडिस फिडिस करतात. तेव्हां कांहीं होवो, आज मी वडिलांचा सूड घेणार! नंतर त्यानें सूड घेण्याच्या भरांत असें ठरविलें कीं, रात्रीं जेवल्यावर आई-वडील ज्या खोलींत झोपतात तेथील खोलीच्या खिडकीजवळ एक मोठा दगड घेऊन बसावयाचें आणि आई-वडील झोपले म्हणजे नेमका तो दगड वडिलांच्या डोक्यावर टाकून त्यांना ठार करावयाचें. पुढें जेवण करून आई वडील नेहमीप्रमाणें झोपण्याच्या खोलींत झोपावयास गेले. त्या वेळी भारवी एक मोठा दगड घेऊन वडिलांना ठार मारण्याकरितां खोलीच्या खिडकीजवळ येऊन उभा राहिला. इतक्यांत आई-वडिलांचा पुढीलप्रमाणें संवाद सुरू झाला.

आई—तुम्ही नेहमीं भारवीला मूर्ख, आळशी, निरुपयोगी, वगैरे म्हणून हिडिस फिडिस करतां तें काय म्हणून!

वडील—अगे, मी जरी त्याला असें म्हणतो तरी तें काय तूं खरेंच का समजतेस? असा गुणी, बुद्धिमान्, व्यासंगी, उद्योगी मुलगा परमेश्वरानें आपल्याला दिला आहे याबद्दल मी मला धन्य समजतो व परमेश्वराचे उपकार मानतो. अशी मुलें फारच थोडी आढळतात. परंतु जर मी त्याची स्तुति त्याच्या देखत करीन तर तो तागलीच गर्विष्ठ होऊन आळशी बनेल आणि व्यासंग उद्योग सोडून देईल. हें होऊं नये

म्हणून मी त्याच्याशी तसें वागतो. त्याचा परिणाम तो सुधारण्याच्या दृष्टीनें चांगलाच होत आहे. वडिलांचे रागें भरण्याचे योग्य कारण समजताच तो त्यांना ठार मारण्याच्या विचारापासून निवृत्त होऊन आपल्या बिछान्यावर येऊन झोपला.

२ आख्यायिका—वडिलांचा निष्कारण वध करणार होतो याबद्दल त्याला वाईट वाटलें. दुसऱ्या दिवशीं सकाळीं भारवि आपल्या वडिलांशीं इकडच्या तिकडच्या गप्पा मारू लागला. त्यात सहज प्रसंग आणून त्यानें असें विचारलें कीं, जर एखाद्यानें 'पितृवध' करण्याचें मनात आणलें तर त्याला प्रायश्चित्त काय? भारवीचे वडील हुशार होते. त्यांनी हसून असें म्हटलें कीं 'पितृवध करण्याचें मनात आणणाऱ्या मुलानें सासुरवाडींत राहून चारा वर्षे त्यांचीं गुरें वळावींत'. नंतर भारवीनें एकांतात जाऊन सर्व विचार करून मानसिक पितृवधाचें प्रायश्चित्त आपल्याला घेतलेंच पाहिजे असें ठरविलें. पुढें दुसरें दिवशीं पहाटे कोणालाही न कळू देता वेष बदलून, अंगावर घोंगडी घेऊन, डोक्याला मुंडासें बांधून व हातात काठी घेऊन निघाला तो सासुरवाडीला पोहचला. भारवीनें गुराख्याचा पोषाख केल्यानें सासुरवाडीच्या मंडळींनी त्याला ओळखिलें नाहीं. नंतर तो सासऱ्याला म्हणाला कीं 'मी एक गरीब गुराखी आहे. जर तुम्ही फक्त जेवू घालून आपल्या घरचीं गुरें राखण्याचें काम मला द्याल तर तें मी चांगलें करीन'. सासऱ्यानें मनात विचार केला कीं नुसत्या अन्नावारी काम करणारा मनुष्य मिळतो तर तो का सोडा? नंतर त्यानें त्याला (भारवीला) सांगितलें कीं तू आमच्या घरी रहा! तुला आम्ही पोटभर जेवावयाला घालू! तू मात्र ठरल्याप्रमाणें दररोज गुरें रानात घेऊन जात जा! त्याप्रमाणें

भारवि रानांत गुरें घेऊन जाऊं लागला. त्याला सासुरवाडीच्या इतर माणसांनीं जरी ओळखलें नाहीं तरी त्याच्या बायकोनें त्याला ओळखलें. तेव्हां तिनें एकान्तांत त्याची भेट घेऊन "वेषांतर करून नियमाविरुद्ध सासुरवाडीचीं गुरें राखण्याची सेवा आपण कोणत्या कारणास्तव पत्करलीत ?" असें विचारलें. तेव्हां भारवीनें सांगितलें कीं, "मी मानसिक पितृवध केला म्हणून पार्वतीच्या सांगण्यावरून त्याचें प्रायश्चित्त येथें बारा वर्षें भोगावयाचें आहे." अशी बायकोला खरी हकीगत सांगून ती गुप्त ठेवण्याबद्दल तिला बजाविलें. तिनेंही त्याप्रमाणें बातमी गुप्त ठेवली. भारवि हा बुद्धिमान् व उद्योगी असल्यानें रानांत गुरें चरावयाला लागलीं म्हणजे फावल्या वेळांत 'किरातार्जुनीय' काव्य रुईच्या पानावर काट्यानें लिहिण्याचें काम करून तीं सर्व पानें एका कणगींत साठवून ठेवी. एकदां भारवीच्या सासरीं लग्नसमारंभ सुरू झाला तेव्हां त्याच्या बायकोला अंगावरचे दारिद्री दागिने पाहून कमीपणा वाटला. व तिनें भारवीची एकांतांत गांठ घेऊन असें सांगितलें कीं, 'आपण नेहमीं उद्योग करतां, विद्वान आहांत, तेव्हां माझ्या अंगावर फुटका मणीही नसावा ! तरी तुम्ही आज कांहींही करा पण मला दागिने आणून द्या.' भारवीला बायकोचें बोलणें ऐकून फार वाईट वाटलें व बायकोला "सहसा विदधीत न क्रियामविवेकः परमापदां पदम् ।" [illegible] अर्धा श्लोक लिहून दिला व कोणाकडे तरी गहाण ठेव आणि हजाराचे दागिने पाहिजेत म्हणून त्याला सांग असें सांगितलें. नंतर तो अर्धा श्लोक घेऊन भारवीची बायको सावकाराच्या बायकोकडे गेली आणि तिला तो श्लोकाचा कागद देऊन म्हणाली कीं हा श्लोकाचा कागद गहाण

ठेवून मला हजाराचे दागिने द्या. सावकाराच्या बायकोनें अर्धा श्लोक वाचला त्यामुळें तिला अत्यंत आनंद झाला व धन्योद्गार काढले. तिनें तो श्लोक आपल्या निजण्याच्या जागीच वर टांगून ठेविला. व हजाराचे दागिने दिले. भावीची बायको दागिनें घेऊन माहेरीं आली आणि तिनें घरांतल्या माणसांना असें सांगितलें कीं दागिने धाडण्या-बद्दल मी मामंजींना निरोप धाडला होता. त्याप्रमाणें त्यांनीं तिकडून येणाऱ्या एका बाईबरोबर हे दागिने धाडले. जिनें हें श्लोकार्धाचें रुईचें पान गहाण ठेविलें होतें, तिचा नवरा व्यापाराकरितां द्वीपांतरास गेला होता. त्या सावकारास तेथें सुमारें १३–१४ वर्षें राहावें लागलें. तो धर्मधर्मसंयोगानें त्याच दिवशीं संध्याकाळीं आपल्या नगराच्या अलीकडे २ कोस अंतरावरच्या गांवीं आला. त्याला वाटलें कीं आपल्या बायकोची वर्तणूक कशी काय आहे, ती गुप्तरीतीनें स्वतः पाहावी. त्याप्रमाणें त्या मध्यरात्रीं तो आपल्या भव्यवाड्यांत आला व बायको निजली होती त्या ठिकाणीं त्यानें आपला प्रवेश करविला. त्या ठिकाणीं रत्नमान् समया जळत होत्या, तो हळू हळू पुढें गेला तों पलंगावर एक जोडपें निजलेलें त्याचे दृष्टीस पडलें. दोघांनीं मिळून एकच वस्त्र पांघरलें होतें आणि तीं दोघें गाढ झोपीं गेलीं होतीं. त्या वेळीं त्यानें रागानें 'त्या दोघांचे चार तुकडे एकदम करण्याचे इच्छेनें' म्यानांतून तरवार बाहेर काढून वर उचलली, तों ती वर टांग-लेल्या रुईच्या पानास लागून तें पान खालीं पडलें. हें काय येथें कोणी टाकलें ! मला कोणी पहात तर नाहींना ! असा विचार त्याने मनांत येऊन तो तें रुईचें पान हातांत घेऊन पाहतो तों 'सहसा विदधीत न क्रियामविवेकः परमापदां पदम्' असें वर लिहिलेलें त्यानें

वाचिलें; अर्थ समजतांच त्यानें वध करण्याचा विचार टाळला व त्यांना अगोदर उठवून मग त्यांस ठार करावें असें त्याचें मनांत आलें. नंतर बायकोला त्यानें उठविलें. तिनें उठून त्याचे तोंडाकडे पाहतांच हा आपला नवरा असें तेव्हांच ओळखिलें व त्याच्या चरणांवर मस्तक ठेवून त्या झोंपलेल्या आपल्या मुलाला उठवून म्हणाली, बाळ, हे तुझे वडील आहेत, तेव्हां तूं त्यांना नमस्कार कर. हें ऐकून त्या सावकाराच्या मनाची स्थिति काय झाली असेल हें सांगावयास नको. हा मुलगा एवढा झाला असून आईपाशीं झोंपला असेल अशी कल्पना, त्यां बायकोच्या वर्तनाचीं परीक्षा पाहणाऱ्याच्या मनांत आली नव्हती. कारण तो जेव्हां देशांतरास गेला तेव्हां त्याची बायको गरोदर होती. नंतर त्यानें मुलाला एकदम मिठी मारून त्या प्रसंगीं काय संकट ओढवलें असतें व तें कसें टळलें तें त्यांस सांगितलें. हें पान येथें कसें आलें व अर्थात श्लोक कोणीं लिहिला, हा विषयीं बायकोला विचारतांच तिनें सविस्तर पूर्वीची घडलेली हकीकत सांगितली. पुढें त्या सावकारानें आपली बायको व मुलगा वाचविणाऱ्या श्लोकाच्या कर्त्याचा शोध लावून त्याला हजारो रुपये बक्षीस देऊन सत्कार केला.

कवींच्या विषयीं माहिती देणारे ग्रंथ— मराठी-१ संस्कृत कविपंचक. कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर, किं. १ रु. ४ आ. हिंदी-संस्कृतकविचर्चा ,पं. बल्देव उपाध्याय. किं. २ रु.

## कोश परिचय

महत्त्व— राजाला ज्याप्रमाणें द्रव्याचा क्षणोक्षणीं उपयोग होतो त्या-प्रमाणें विद्वान् माणसाला अर्थज्ञानासाठीं शब्दसंग्रहाची वारंवार जरूरी

लागतें. म्हण— ज्यानें ककारत्रयी ( काव्य, कौमुदी, कोश ) तयार केली नाहीं, त्याची संस्कृत भाषेंत कधींहि गति होणार नाहीं.

**अमरकोश**— याचा कर्ता ' अमरसिंह ' हा आहे.

**काण्ड**— या कोशांत प्रथमकाण्ड, द्वितीयकाण्ड, तृतीयकाण्ड, अशीं तीन कांडें आहेत.

**संस्कृत शब्दाचें वैशिष्ट्य**—संस्कृत भाषेंत एकाच शब्दाला अनेक प्रतिशब्द असून त्यांत भिन्न भिन्न अर्थांच्या छटा प्रगट करण्याचें सामर्थ्य आहे. Water जलं, सलिलं, वारि, उदकं, पयः, तोयं, पानीयं, आपः, नीरं, अम्बु. The sea or ocean— समुद्र, अब्धि, उदधि, सिन्धु, सागर, अर्णव, रत्नाकर, जलनिधि. Earth भू, भूमि, धरा, धरित्री, धरणी, वसुधा, उर्वी, वसुन्धरा, पृथिवी, पृथ्वी, मही, अवनि, मेदिनी, जगती. A flower—सुमनस्, पुष्पं, कुसुमं, सुमं, प्रसून. A lion —सिंह, मृगेन्द्र, केसरी, हरि, मृगरिपु, कण्ठीरव. A crow— काक, ध्वाङ्क्ष, वायस, Man—मनुष्य, मानुष, मर्त्य, मनुज, मानव, नर. A Woman or Female—स्त्री, अबला, योषा, नारी, सीमन्तिनी, वधू, वनिता, महिला. A son—आत्मज, तनय, सूनु, सुत, पुत्र.

---

## संस्कृत कोश.

| नांव | काल | कर्ता |
|---|---|---|
| १ अमरकोश | इ.स.पू. ६००श० | अमरसिंह |
| २ अनेकार्थ समुच्चयकोश किं. २ रु. | ” ” | शाश्वत |

| | | |
|---|---|---|
| ३ अभिधानरत्नमाला किं१०६. | इ.स.१०शं० | हलायुध |
| ४ वैजयंती | इ.स.१०५५शं० | यादवप्रकाश |
| ५ विश्वप्रकाश | ,, ,,१११११शं० | महेश्वर |
| ६ नानार्थ शब्दकोश | ,, ,,१४००शं० | मेदिनीकर |
| ७ नानार्थ संग्रह कोश | इ.स. ११४० | अजयपाल (बौद्ध) |
| वैदिककोश | इ.स. १७३० | भास्करराय |
| शब्दकल्पद्रुम | इ.स. १८२२ | राधाकांत देव |
| विश्वप्रकाशकोश | | महेश्वरसूरि |
| वर्णदेशना(वर्णविचार) | | पुरुषोत्तम |
| वाचस्पत्यकोश | | तारानाथ तर्कवाचस्पति |

पाळकचा किं. ३१५ रु.

## संस्कृत—मराठी कोश

| | | |
|---|---|---|
| १ संस्कृतकोश | सन १८५३ | अनंतशास्त्री तळेकर |
| २ शब्दरत्नाकर | सन १८७० | माधव चंद्रोबा |
| ३ संस्कृतकोश | सन १८७२ | नारो अप्पाजी गोडबोले व वेल्कर. |
| ४ गीर्वाण लघुकोश किं. ४ रु. | | जनार्दन विनायक ओक. |

### संस्कृत—इंग्लिश डिक्शनरी

| | |
|---|---|
| १ संस्कृत इंग्लिश डिक्शनरी | मानिअरवुल्यम्स ७५ रु. |
| २ संस्कृत इंग्लिश डिक्शनरी | कै. वामनराव आपटे १५रु८ आणे. |
| ३ संस्कृत इंग्लिश डिक्शनरी | श्री. वैद्य. दुर्मिळ |
| ४ संस्कृत इंग्लिश डिक्शनरी | श्री. भिडे. दुर्मिळ |

## संस्कृत—जर्मन डिक्शनरी.

संस्कृत—जर्मन डिक्शनरी ( ऐतिहासिक दृष्टीनें लिहिलेली व वैदिक वाङ्मयास उपयुक्त ) By Bohtlingh. किं. १५० रु.

---

## कथा.

पंचतंत्र—कर्ता—पंडित विष्णुशर्मा. विषय—मुलांना नीति व व्यवहार यांचे शिक्षण मिळावें व त्यांचे मनोरंजन व्हावें या हेतूनें काल्पनिक पशुपक्षादिकांच्या गोष्टी लिहिलेल्या आहेत. तंत्र—१ मित्रभेद, २ मित्रप्राप्ति, ३ काकोलुकीय, ४ लब्धनाश, ५ अपरीक्षितकारक, अशीं पांच तंत्रें आहेत.

हंसाचें अनुकरण करावें—व्याकरणशास्त्राला खरोखरी शेवट नाहीं, तसेंच जगांतील विद्या शिकण्यास लागणाऱ्या वर्षांच्या दृष्टीनें माणसाचें आयुष्य थोडें व विघ्नें जास्त. हंस जसा पाणी मिसळलेल्या दुधांतील फक्त दूध तेवढेंच घेतो तसें माणसानें त्या त्या विद्यांतील आवश्यक भाग तेवढाच घेऊन बाकीचें सोडावें.

अनन्तपारं किल शब्दशास्त्रं स्वल्पं तथायुर्बहवश्च विघ्नाः ।
सारं ततो ग्राह्यमपास्य फल्गु हंसो यथा क्षीरमिवाम्बुमध्यात् ॥

जगणें—विज्ञान ( कला-कौशल्यादिविद्या ), शूरपणा, ऐश्वर्य ह्या श्रेष्ठ गुणामुळें क्षणभर जो माणसें समजतात, त्याला शहाणे लोक ' जगणें ' असें म्हणतात. नाहींतर दुसऱ्यांनीं टाकलेल्या पानावळि खाऊन कावळा सुद्धां पुष्कळ दिवस जगतो. ( तात्पर्य दुसऱ्याच्या मिनतवारीनें जगणें हें लाजिरवाणें होय. मुहूर्तं ज्वलितं श्रेयः नच धूमायितं चिरं । या उक्तीप्रमाणें ' जगणें ' उत्तम होय. )

यज्जीव्यते क्षणमपि प्रथित मनुष्यैर्विज्ञानशौर्यविभवार्यगुणै समेतम्।
तन्नाम जीवितमिह प्रवदन्ति तज्ज्ञा काकोऽपि जीवति चिर च बलिं च भुङ्क्ते ॥

तर्क—' चल, जा, ये, याव ' इत्यादि उच्चारलेला विषय पशुसुद्धा जाणतो त्याप्रमाणें घोडे, हत्ती, याना प्रवृत्त केले असता ती प्रवृत्त होतात हें आपण पाहतो शहाणा मनुष्य रागरगावरून दुसऱ्यानें सागितलेला विषयही जाणू शकतो कारण दुसऱ्याच्या मनातल्या विषयाचें ज्ञान करून घेणें हेंच बुद्धीचें फल होय

उदीरितोऽर्थ पशुनापि गृह्यते हयाश्च नागाश्च वहन्ति चोदिता ।
अनुक्तमप्यूहति पण्डितो जन परेङ्गितज्ञानफला हि बुद्धय ॥

तर्क—आकार, मनातील भाव विशेष, जाणें-येणें, हालचाल, भाषण, डोळे-तोंड, ह्याचे बरें वाईट विकार, यामुळें मनाचा अभिप्राय समजतो

आकारैरिङ्गितैर्गत्या चेष्टया भाषणेन च ।
नेत्रवक्त्रविकारैश्च गृह्यतेऽन्तर्गत मन ॥

बुद्धि—कार्याना आरभ न करणें हें बुद्धीचें पहिलें लक्षण होय आरभिलेलें कार्य शेवटाला नेणें हें बुद्धीचे दुसरें लक्षण होय

अनारम्भो हि कार्याणा प्रथम बुद्धिलक्षणम्।
प्रारब्धस्यान्तगमन द्वितीय बुद्धिलक्षणम् ॥

नवऱ्यामुलाचे सात गुण—नवऱ्यामुलाचे कुल, शील, पालक, विद्या, द्रव्य, शरीर, वय, ह्या सात गुणाची परीक्षा करून मुलगी द्यावी बाकीच्या गोष्टींचा विचार करू नये

कुल च शील च सनाथता च विद्या च वित्त च वपुर्वयश्च ।
एतान् गुणान् सप्त परीक्ष्य देया कन्या बुधै शेषमचिन्तनीयम् ॥

**अव्यवहारी**—शास्त्रांमध्यें प्रवीण असलेल्या परंतु व्यवहारज्ञान नसलेल्या लोकांचें मूर्खपंडिताप्रमाणें लोकांमध्यें हसें होतें.

अपि शास्त्रेषु कुशला लोकाचारविवर्जिताः ।
सर्वे ते हास्यतां यान्ति यथा ते मूर्खपण्डिताः ॥

तंत्र ५ अपरीक्षितकारक.

**गुणी माणसाजवळ संपत्ती राहते**—उत्साही, चेंगट नसलेला, कार्य करण्यांत हुशार, व्यसनी नसलेला, शूर, केलेला उपकार जाणणारा, दाटमैत्री असलेला, अशा माणसाजवळ राहण्याकरितां लक्ष्मी स्वतः त्याला शोधते.

उत्साहसम्पन्नमदीर्घसूत्रं क्रियाविधिज्ञं व्यसनेष्वसक्तम् ।
शूरं कृतज्ञं दृढसौहृदं च लक्ष्मीः स्वयं मार्गति वासहेतोः ॥

तंत्र २, मित्रप्राप्ति.

**मराठी भाषांतर**—'पंचतंत्रांतील गोष्टी' वा. मा. आवेकरकृत प्रकाशन–चित्रशाळा, पुणें. किंमत १ रु. ८ आ.

**संस्कृत टीका**—'सुबोधिनीव्याख्या' नृसिंहदेवशास्त्रीकृत, प्रकाशन–मेहेरचंद लक्ष्मणदास, लाहोर. किंमत २ रु. ८ आ. याशिवाय नीति व व्यवहार याचें शिक्षण देणारे खालीलप्रमाणें गोष्टींचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. **इंग्लिशभाषांतर**—एम्. आर्. काळे. Franklin Edgerton

सोमदेवकृत—कथासरित्सागर, गुणाढ्यकृत—बृहत्कथा, क्षेमेंद्रकृत-बृहत्कथामंजरी, वेतालपंचविंशति, सिंहासनद्वात्रिंशति, शुकसप्तति, शुक्रनीति, चाणक्यसूत्रें, विदुरनीति, वगैरे.

## हितोपदेश परिचय

विद्यार्थ्यांना व्यवहार व नीति यांचे शिक्षण निबंधाच्या द्वारें देण्यापेक्षां ते काल्पनिक मनोरंजक गोष्टींच्या रूपानें देणें परिणामाच्या दृष्टीनें उत्तम कसें असतें, हे **इसापनीती** सारख्या लोकप्रिय झालेल्या पुस्तकावरून कळतें. वैशिष्ट्य-हितोपदेशांत गोष्टींच्या अनुरोधानें सुभाषितें दिलीं आहेत, त्यामुळें मनाची करमणूक व उपदेश या बरोबर माणसाच्या अंगीं बहुश्रुतपणा आणण्याचेंही काम त्याच्या हातून होतें. गोष्टींच्यामुळें सुभाषितांचें वैशिष्ट्य लक्ष्यांत येतें. व सुभाषितांच्यामुळें गोष्टीचें मर्म ध्यानांत येतें. शाहण्या लोकांनीं माणसाच्या स्वभावाचें व मनोरचनेचें सूक्ष्म अवलोकन करून सर्व मानवजातीला मार्गोपदेशक होणारे सिद्धांत या सुभाषितांतून दृष्टीस पडतात.

**प्रकरणें**— १ मित्रलाभ, २ सुहृद्भेद, ३ विग्रह, ४ संधि.

**सुभाषितें—जन्मसाफल्य**— ज्याच्या जन्माच्यामुळें कुलाची प्रसिद्धी होते तोच खरा जन्माला आला, नाहीतर या जगाच्या रहाटगाड्यांत जन्म-मरणाची धडामोड सारखी चालूच आहे.

*स जातो येन जातेन याति वंशः समुन्नतिम् ।*
**परिवर्तिनि संसारे मृतः को वा न जायते ॥** प्रस्ताविका श्लोक, १४.

**सहासुखें**—१ पैसे मिळणें, २ नेहमीं निरोगी शरीर-प्रकृति असणें, ३ प्रेमी व ४ मधुर भाषण करणारी बायको असणें, ५ आज्ञेप्रमाणें वागणारा मुलगा असणें, ६ पैसा मिळवून देणारी विद्या अंगीं असणें अशी सहा सुखें संसारांत आहेत.

अर्थागमो नित्यमरोगिता च प्रिया च भार्या प्रियवादिनी च ।
वश्यश्च पुत्रोऽर्थकरी च विद्या षड् जीवलोकस्य सुखानि राजन् ॥
प्रस्ताविका, श्लोक.१९

**आई वडिलांचे कर्तव्य**—आई-वडिलांच्या कडून अभ्यास करविलेला मुलगा गुणी होतो. उपजताच कोणताही मुलगा पंडित होत नाही.

मातापितृकृताभ्यासो गुणितामेति बालकः ।
न गर्भच्युतिमात्रेण पुत्रो भवति पण्डितः ॥ ३८

**सहा दोष**— आपली उन्नति व्हावी अशी इच्छा करणाऱ्या माणसानें १ झोप, २ जडत्व, ३ भीति, ४ क्रोध, ५ आळस, ६ चेंगटपणा. या दोषांचा त्याग केला पाहिजे.

षड् दोषाः पुरुषेणेह हातव्या भूतिमिच्छता ।
निद्रा तन्द्रा भयं क्रोध आलस्यं दीर्घसूत्रता ॥ मित्रलाभ, श्लोक ३४.

**मराठी भाषांतर**—वा. मा. आवेकर किं. १ रु. प्रकाशक—चित्रशाळा, पुणें.

## नाट्यशास्त्रपरिचय

संस्कृत वाङ्मयात काव्याचे ' दृश्य ' व ' श्रव्य ' असें दोन भेद केले आहेत. त्यांपैकीं दृश्य काव्यात ' नाट्यशास्त्राचा प्रकार ' येतो. नाटक वगैरे प्रकाराला ' रूपक ' असें सामान्यतः म्हणतात; ' रूपकाला ' रूप अथवा नाट्य अशीं नांवे आहेत. रूपकाचें नाटक, प्रकरण, भाण, प्रहसन, डिम, व्यायोग, समवकार, वीथी, अंक, ईहामृग असें १० प्रकार आहेत. ( रूपकाचा उपरूपक हा भेद व त्याचे पुनः १८ प्रकार आहेत. )

अवस्थानुकृतिर्नाट्यं रूपं दृश्यतयोच्यते ।
रूपकं तत्समावेशात् दशधैव रसाश्रयम् । दशरूपक
रूप्यतेऽभिनयैर्यत्र वस्तुतद्रूपकं विदुः ।

**काल**— इ. स. पूर्व १४०० ते ५००. पूर्वी समाजाला नैतिक शिक्षण देऊन करमणूक करणारी अशी नाट्य-संस्था होती; म्हणून या संस्थेला पाचवा वेद म्हटले आहे.

**गोष्ट**—भरतादि आदि वगैरे ऋषींनीं नाट्यशास्त्राची उत्पत्ति कशी झाली ? असा प्रश्न विचारला. तेव्हां भरतानें पुढीलप्रमाणें गोष्ट सांगितली—कृतयुगांत ब्राह्मण पवित्रपणें वागत असत. त्रेतायुगांत ते काम-क्रोध-लोभादिकांच्या आधीन होऊन अपवित्रपणानें वागूं लागले. ते पाहून यक्ष, गंधर्व, राक्षस, इंद्र हे सर्वजण ब्रह्मदेवाकडे जाऊन म्हणाले कीं 'हे ईश्वरा, आम्हाला असा कांहीं नवीन खेळण्याचा मार्ग सांग कीं जो वेदाप्रमाणें असूं नये. कारण शूद्रांनीं वेद ऐकूं नये असा नियम आहे तो या खेळांत असूं नये. तो खेळ शूद्र वगैरेंना पाहण्यासारखा व ऐकण्यासारखा असावा. नंतर ब्रह्मदेवानें एक 'नाट्यप्रयोग' तयार करून असें सांगितलें कीं पवित्रधर्म, इच्छित गोष्ट व यश प्राप्त करून देणारा, सर्ववेद-उपवेद यांचें संकलन असणारा, अध्ययन-अध्यापन करण्यास योग्य असा हा पांचवा नाट्य वेद आहे.

**संस्कृत नाट्यग्रंथः**— १ नाट्यदर्पण–रामचंद्रसुरिकृत. २ नाट्यशास्त्र–भरतकृत. **मराठी नाट्यशास्त्र**–कै. प्रो. चिं. ग. भानू.

**भरतनाट्यशास्त्र**— १ ते २७ अध्यायांत नाट्यशास्त्राची माहिती दिली आहे. अध्याय २ यामध्यें, नाटकगृह कसें असावें याचें वर्णन आहे. अध्याय ४ या मध्यें 'नाच' कसा असतो त्याचें वर्णन आहे. पुरुषाच्या नाचाला 'तांडव नृत्य' म्हणतात व स्त्रियांच्या नाचाला 'लास्यनृत्य' म्हणतात. शंकराचें 'तांडवनृत्य' प्रसिद्ध आहे. हल्लीं उदयशंकर, सौ. मेनका, वगैरे प्रसिद्ध नृत्यविशारदांचे नाच सुप्रसिद्ध आहेत. अध्याय ८ व ९ यामध्यें 'अभिनय' कसा करावा याचें वर्णन आहे. अध्याय २१ मध्यें नाटकांतील पात्रें, देखावे याचें वर्णन आहे.

## प्रसिद्धनाटकें

| नांव | कर्ता व त्याचा काल | अंक | टीका | टीकाकार |
|---|---|---|---|---|
| १ अभिज्ञान शाकुंतल | कालिदास (इ. स. ५ शतक) | ७ | अर्थद्योतनिका | राघवभट्ट |
| २ मालविकाग्निमित्र | कालिदास | ५ | १ व्याख्यान<br>२ सरला | १ काटयवेमभूप<br>२ रंगाचार्य रड्डी |
| ३ विक्रमोर्वशीय | कालिदास | | प्रकाशिका | रंगनाथ |
| ४ उत्तररामचरित | भवभूति (८ वें शतक) | ७ | तत्त्वस्पर्शिनी | वीरराघव |
| ५ महावीरचरित | भवभूति | ७ | ,, ,, | वीरराघव |
| ६ मालतीमाधव | भवभूति | १० | भावप्रदीपिका | त्रिपुरारि, जगद्धर |
| ७ मृच्छकटिक | शूद्रक | १० | मृच्छकटिकविवृति | पृथ्वीधर |
| ८ मुद्राराक्षस | विशाखदत्त | ७ | व्याख्यान | ढुंढि |

| नाटक | कर्ता | | टीका | टीकाकार |
|---|---|---|---|---|
| ९ वेणीसंहार | भट्टनारायण | | १ बालबोधिनी<br>२ टिप्पणी | १अप्पाशास्त्री राशिवडेकर<br>२जगद्धर |
| १० नागानंद | हर्षदेव इ. स. ६०६ | | | |
| ११ रत्नावली नाटिका | हर्षदेव | ४ | प्रभा | निगुडकर |
| १२ प्रबोधचंद्रोदय | कृष्णमिश्रयति | ६ | १ चंद्रिका<br>२ प्रकाशा | १ शेखर<br>२ दीक्षित |
| १३ छत्रपति साम्राज्य | मू. मा. याज्ञिक | १० | किं. १ रु. ४ आणे. | |

( तोरणा लाभापासून राज्याभिषेकापर्यंत, अफझुलखान वध, सिंहगडप्राप्ति, आग्र्याहून सुटका वगैरे शिवाजीच्या चरित्रांतील प्रसंग. इंग्रजी भाषांतरासहित ).

१४ शेक्सपिअर नाटककथावली, वेंकटरमणाचार्य, मद्रास

१५ भासाची तेरा नाटकें इ. पू. २००

ओरिएन्टल बुक एजन्सी पुणें यांचे प्रकाशन किं. ६ रु.

नाटक— (१) नाटकामध्यें नाट्यवस्तु ( विषय, कथा Plot ) इतिहास अथवा परंपरागतकथा, यावर आधारलेली असावी लागते. (२) नाटकांत शृंगार, वीर, करुण, यापैकीं एक रस (शृंगार, वीर, करुण, अद्भुत, हास्य, रौद्र, भयानक, बीभत्स, शांत, असे ९ रस आहेत. ) मुख्य असावा लागतो. (३) प्रत्येक नाटकाला नान्दी, प्रस्तावना व शेवटीं भरतवाक्य, हीं असलींच पाहिजेत.

नाटिका—' नाटिका ' ही बहुधा काल्पनिक असते, स्त्रीपात्रांचें आधिक्य असून शृंगाररस मुख्य असावा लागतो. त्याप्रमाणें चार अंक असावे लागतात. ( नाटिका क्लृप्तवृत्ता स्यात् स्त्रीप्राया चतुरङ्किका । ) ' श्रीहर्षकृत ' ' रत्नावली व प्रियदर्शिका ह्या नाटिका आहेत.

## शाकुंतल परिचय

कर्ता–कालिदास—शाकुंतल नाटकाची जगांतील प्राचीन व अर्वाचीन ( भारतीय आणि युरोपस्थ ) संस्कृत रसिकांनीं मुक्तकंठानें स्तुति केलेली आहे. सर विल्यम जोन्सनें इंग्लिशमध्यें ( इ.स. १७८९ मध्यें ) प्रथम भाषांतर केलें. शाकुंतल वाचून प्रसिद्ध फ्रेंच विद्वान शेझी [Chezy] आणि जर्मन प्रसिद्ध कवि गटे [Goethe] ह्यांना इतका आनंद झाला कीं त्यांनी शाकुंतलाचें पुस्तक डोक्यावर घेऊन नाच केला.

विशेष—काव्यांत नाटक सुंदर होय, नाटकांत शाकुंतल नाटक सुंदर होय, त्यांतील ४ था अंक सुंदर व त्यांतही ४ श्लोक सुंदर होत.

काव्येषु नाटकं रम्यं तन्मध्ये च शकुन्तलम् ।
तत्रापि च चतुर्थोऽङ्कस्तत्र श्लोकचतुष्टयम् ॥

**नांव**--अभिज्ञान म्हणजे ओळख पटण्याची खूण. खूण दृष्टीस पडतांच राजाला शकुंतलेची आठवण झाली. या प्रसंगाचें वर्णन ह्या नाटकांत असल्यामुळें 'अभिज्ञानशाकुंतल' असें कालिदासानें नाटकास नांव दिलें. **अंक ७. पात्रें**--**दुष्यंत**--पुरुवंशांतील हस्तिनापुरचा एक राजा. **शकुंतला**-कण्वाची मानलेली मुलगी, दुष्यंताची बायको. **प्रियंवदा** व **अनसूया**- शकुंतलेच्या मैत्रिणी. **सर्वदमन**--दुष्यंताचा पुत्र. **गौतमी**--एक वृद्ध तपस्विनी. **ऋषी**-- कण्व, दुर्वास, मारिच. **मातलि**--इंद्राचा सारथी.

**१ ल्या अंकांत**--दुष्यंत राजा आपल्या बरोबर सेवक व सैन्य घेऊन अरण्यांत शिकार करण्यासाठीं गेला होता. एके दिवशीं तो रथांत बसून एका हरिणाचा पाठलाग करीत करीत फार लांब गेला. नंतर तो हरिण बाणाच्या टप्प्यांत येतांक्षणींच त्यानें त्याच्यावर नेम धरला. तेव्हां कांहीं तपस्वी मध्यें येऊन म्हणाले कीं--'राजा, **आश्रमांतील हा हरिण आहे, म्हणून तूं त्याला मारूं नकोस**'. दुष्यंतराजानें तत्काळ बाण मागें घेऊन त्या तपस्व्यांना नमस्कार केला. तेव्हां त्यांनीं राजाला आशीर्वाद देऊन विनंती केली कीं, 'येथून जवळच मालिनी नांवाच्या नदीकाठीं कण्वऋषींचा आश्रम आहे, तूं तेथें जाऊन आश्रमांतल्या लोकांना आनंदित कर.' पाहुण्यांच्या आदरातिथ्याच्या कामीं कण्वऋषींनीं शकुंतला नांवाच्या कन्येची योजना केली आहे आणि स्वतः ते तिच्या प्रतिकूल, अनिष्ट अशा ग्रहांची शांति करण्याकरितां सोमतीर्थाला गेले आहेत. ती शकुंतला तुझें

आदरातिथ्य करील. तें ऐकून दुष्यंत राजानें सारथ्याला आश्रमाकडे रथ हाकण्यास सांगितलें. आश्रमाच्या सीमेवर रथ उभा करविला. नंतर दुष्यंतराजानें आपली राजभूषणें सारथ्यापाशीं देऊन स्वतः एकटाच आश्रमांत गेला. तोंच त्याचा उजवा बाहु स्फुरण पावून त्यानें कांहीं तरी फायदा दर्शविला. कोणीतरी बोलत आहेत असा कानोसा घेऊन तो पुढें बागेंत शिरला. तेथें शकुंतला ही अनसूया व प्रियंवदा या मैत्रिणीसह झाडांना पाणी घालीत होती. त्यांचा आपसांत विनोद चालला होता. शकुंतलेचें आकर्षक सौंदर्य पाहून दुष्यंतराजा आश्चर्यचकित झाला, व झाडाच्या आड लपून त्यांचीं भाषणें ऐकत राहिला. इतक्यांत एक भुंगा मोगरीच्या फुलावरून उठून शकुंतलेच्या तोंडावर झडप घालूं लागला. त्यामुळें शकुंतला घाबरून मैत्रिणींना बोलावूं लागली. त्यांनीं, 'राजानें तपोवनाचें रक्षण करावयाचें, सबब तूं दुष्यंतराजाला बोलाव' असें थट्टेनें म्हटलें. तें ऐकून दुष्यंतराजा पुढें झाला. त्याला पाहून त्या आश्चर्यचकित झाल्या, व त्याच्या आदरातिथ्याची सामुग्री आणण्याकरितां निघाल्या. परंतु दुष्यंतराजानें 'नको' असें सांगितल्यावर सर्व सातवणाच्या ओटयावरील दाट छायेंत बसले. शकुंतला व दुष्यंतराजा,एकमेकाचें रूप पाहून एकमेकावर मोहित (आसक्त) झालीं, तथापि शकुंतला ही ब्राह्मणाची मुलगी असेल की काय असा दुष्यंतराजाला संशय होता. तो संशय प्रियंवदेच्या बोलण्यावरून नाहींसा होऊन ती मेनका नामाच्या अप्सरेच्या पोटीं जन्मलेली विश्वामित्र ऋषीची मुलगी आहे, असें त्याला कळलें व ती आपल्याला मिळावी अशी दुष्यंतराजाच्या मनांत उत्कट इच्छा उत्पन्न झाली. कण्वऋषी शकुंतलेचा विवाह करण्याच्या विचारांत आहेत असें

जवळ सांगितलें. इतक्यांत तेथें कांहीं ऋषि येऊन त्याला म्हणाले कीं—' **कण्वऋषि आश्रमांत नसल्याकारणानें राक्षस आमच्या यज्ञादिकर्माला अत्यंत पीडा करतात म्हणून आपण येथें कांहीं दिवस आश्रमांत वस्ति करून आमची इष्टि यथासांग पूर्ण होण्यास मदत करावी.** दुष्यंतराजाला जें पाहिजे होतें तेंच नेमकें मिळालें. त्यानें ऋषींचें म्हणणें मान्य करून आश्रमांकडे जाण्याकरितां रथ आणविला, परंतु नगराकडून आईचें कांहीं पुत्रकृत्यादिकाकरितां आम्हांचें बोलावणें आलें. त्यामुळें तो पेचप्रसंगांत पडला. शेवटीं त्यानें आपल्या आईनें विदूषकाला मुलाप्रमाणें मानलें असल्यानें सर्व लव्याजम्यासह त्यालाच नगराकडे धाडण्याचें निश्चित केलें, व तो एखादे वेळीं जनानखान्यांत आपलें शकुंतलेवर मन बसल्याचें सांगेल म्हणून मी तुझ्यापाशीं ' **जें शकुंतलेबद्दल सांगितलें तीं थट्टा आहे त्यांत खरें कांहीं नाहीं** ' असें सांगून त्याला नगराकडे धाडला व स्वतः आश्रमांत गेला.

**३ ऱ्या अंकांत**— दुष्यंतराजानें आश्रमांत वस्ति केल्यामुळें राक्षसांचा पूर्ण बंदोबस्त झाला. यज्ञादिकर्में निर्विघ्नपणें पार पडूं लागलीं. शकुंतला अत्यंत रंगून लताकुंजांत पुष्पांच्या शय्येवर पडून राहिली असतां व मैत्रिणी तिची शुश्रूषा करीत बसल्या असतां, मदनाच्या बाणांनीं पीडित झालेला दुष्यंतराजा तिचा शोध करीत करीत तेथें आला, व लताकुंजाच्या आड दडून त्यांचीं भाषणें ऐकत बसला. शकुंतलेचें मन दुष्यंतराजावर बसल्यामुळें मदनाच्या पीडेनें तिची अशी अवस्था झाली असावी असा तर्क करून तिला तिच्या त्रासाचें कारण मैत्रिणींनी आम्हांनें वारंवार विचारलें. तेव्हां शकुंतलेनें दुष्यंतराजावर

आपलें प्रेम बसल्याचें कळवून 'तो राजा ज्या रीतीनें मला पत्करील असा एक उपाय काढा, नाहीतर माझी आशा सोडा' असें सांगितलें. प्रियंवदेनें दुष्यंतराजाला उद्देशून एक प्रेमपर गीतपत्र बनविण्यास सांगितलें. शकुंतलेनें तें गीत बनविलें व कमळाच्या पानावर नखांनीं कोरून लिहिलें आणि आपल्या मैत्रिणींना वाचून दाखविलें. इतक्यांत दुष्यंतराजानें पुढें होऊन आपली आतुरता दाखविली. शकुंतलेला आणि तिच्या परिचितांना पश्चात्ताप होणार नाहीं असें वर्तन ठेवण्याबद्दल मैत्रिणींनीं त्याला बजाविलें. नंतर दुष्यंतराजानें असें सांगितलें कीं, 'माझ्या पुष्कळ स्त्रिया असल्या तरी पृथ्वी व शकुंतला, ह्या दोघीजणीच माझ्या कुळाला मुख्य आधार आहेत असे समजा.' पुढें कांहीं तरी कारणास्तव मैत्रिणी तेथून गेल्या. शकुंतलेला बापाच्या परवानगीवाचून आपल्या मनाच्या अधीरतेला बळी पडण्याचें धाडस झालें नाहीं. दुष्यंतराजानें 'पूर्वी पुष्कळ राजकन्येचें प्रेमविवाह (गान्धर्व विवाह) झालेले आहेत, आणि त्यांच्या वडिलांनीं पण ते पसंत केलेले आहेत,' म्हणून तुला घाबरण्याचें कांहीं एक कारण नाहीं, अशी तिची समजूत केली, व तिचे चुंबन घेणार इतक्यांत गौतमी नांवाची एक वृद्ध तपस्विनी तेथें समाचारासाठीं आली तेव्हां दुष्यंतराजा झाडाच्या आड लपला, व संधि प्राप्त झाली असतांही इच्छा तडीला न गेल्याबद्दल दुःखानें परत त्याच लताकुंजामध्यें येण्याचें शकुंतलेला सुचविलें. इकडे तिन्हिसांज झाल्यानें गौतमीबरोबर शकुंतला आश्रमांत गेली. दुष्यंतराजा सुस्त राहिला.

४ थ्या अंकांत—दुष्यंतराजा व शकुंतला ह्यांचा प्रेमविवाह झाला. इष्टि संपल्यावर ऋषींनीं दुष्यंतराजाला निरोप दिला. शकुंतलेचा निरोप

घेताना स्वत:च्या नावाचीं अक्षरें कोरलेली अशी आंगठी दुष्यंतराजानें तिच्या हाताच्या बोटांत घातली. आंगठीवरील एकेक अक्षर रोज मोजीत जा, म्हणजे ज्या दिवशीं शेवटचें अक्षर येईल, त्या दिवशीं माझा नोकर तुला माझ्या जनानखान्यांत नेण्याकरितां येईल ' असें बोलून दुष्यंतराजा स्वत:च्या राजधानीकडे गेला. शकुंतलेला दुष्यंताच्या विरहानें कांहीं एक सुचेनासें झालें व तिचें सर्व लक्ष त्याच्याकडे लागलें. इतक्यांत भिक्षेसाठीं दुर्वास नावाचा ऋषि आला ' व आश्रमांत कोण आहे?' म्हणून पृच्छा केली. उत्तर न मिळाल्यानें 'हे उन्मत्त पोरी, ज्याचें चिंतन करण्यांत मग्न होऊन अतिथि असलेल्या माझ्या प्रश्नाकडे तू दुर्लक्ष करीत आहेस त्याअर्थी तो आठवण दिली तरी तुला ओळखणार नाहीं!' असा शाप देऊन गेला. शकुंतलेच्या मैत्रिणी जवळच फुलें गोळा करीत होत्या. त्यांनीं ती शापवाणी ऐकली. आणि दचकून धावत्या धावत्या दुर्वासाची विनवणी करून असा उश्शाप मिळविला की ' ' खुणेची वस्तु ( दागिना ) दिसली तर हा शाप बाधक होणार नाहीं. शकुंतलेपाशीं दुष्यंताची आंगठी होती; त्यामुळें मैत्रिणींना जरा धीर आला. शकुंतलेला ही बातमी ज्ञात नव्हती, तिच्या नाजुक अंत:करणाला त्रास होईल म्हणून मैत्रिणींनीं मुद्दाम शापाची बातमी कळविली नाहीं. नंतर दुष्यंत राजानें शांतिकर्म मुक्त होऊन गेली व आणखी हि कांहीं दिवस गेल्यावर दुष्यंताकडून कोणीहि न आल्यानें शकुंतलेला आणि तिच्या मैत्रिणींना फार चिंता वाटली. शकुंतलेची गरोदरपणाची चिन्हें दिसूं लागलीं. नंतर यज्ञशाळेंत अनुष्ठान करून आश्रमांत आले यज्ञशाळेंत दिसत नाहीं ' हे ब्राह्मणा, शर्मीच्या पोटीं ज्याप्रमाणें

विषयी योग्य उपदेश केला. शेवटीं अनसूया व प्रियंवदा यांच्यासह परत आश्रमांत आले. हस्तिनापुराकडे शकुंतला, गौतमी, शार्ङ्गरव, शारद्वत, हे गेले.

**५ व्या अंकांत**— दुष्यंतराजाला दुर्वासऋषींच्या शापामुळें शकुंतलेचें पूर्ण विस्मरण झालें एके दिवशीं दरबारीं कामकाज संपवून तो विश्रांति घेण्यासाठीं बसला असतां कण्वऋषींच्या आश्रमांतून स्त्रियासह कांहीं ऋषि आले आहेत असें कळलें त्याचा सत्कार करून आपल्याकडे आणण्याबद्दल त्यानें उपाध्यायाला कळविलें. त्याप्रमाणें उपाध्याय त्यांना घेऊन दुष्यंताकडे आला. ऋषींच्या बरोबर घुंगट घेतलेली सुंदर स्त्री पाहून दुष्यंनाला आश्चर्य वाटलें. नंतर ऋषींनी— **' तूं प्रेमाने गांधर्व विधीनें माझ्या कन्येचें जें पाणिग्रहण केलेस तें मला संमत आहे. आतां आपल्या धर्मपत्नीचा स्वीकार करून तिच्या बरोबर धर्माचरण कर '** असा दुष्यंताला कण्वऋषींचा निरोप सांगितला. तेव्हां दुष्यंतानें ह्याबद्दल मला कांहीं एक ठाऊक नाहीं असें उत्तर दिलें. नंतर गौतमीनें शकुंतलेचा बुरखा काढिला. दुष्यंतराजा शकुंतलेचें मोहक लावण्य पाहून मोहित झाला. परंतु ' मला कांहीं आठवत नाहीं, स्त्री तर ही गरोदर आहे, म्हणून मला हिचा स्वीकार करितां येणार नाहीं ' तेव्हां शार्ङ्गरवानें दुष्यंताची निंदा केली. शकुंतलेला अगोदरपासून भय वाटत होते तें शेवटीं खरें ठरून दुष्यंताची खात्री करण्याकरितां ती आंगठी शोधूं लागली, परंतु शचीतीर्थाला नमस्कार करतांना ती आंगठी बोटांतून पाण्यांत पडली होती. शकुंतलेनें आश्रमांतील प्रसंगांनांत घडलेली आठवण दिली. दुष्यंत म्हणाला ' कांहीं तरी खोटें आहे '. तें ऐकून शकुंतला, वगैरेंना राग आला.

नंतर गौतमी शार्ङ्गरव वगैरे परत निघाली. त्यांच्या मागून शकुंतला रडत येऊं लागली, तेव्हां सगळ्यांनीं 'तूं येथेंच रहा परत येऊं नकोस' असें सांगितलें. शकुंतलेला कंप सुटला. शेवटीं उपाध्यायानें दुष्यंताला सांगितलें कीं—ही मुलगी बाळंत होईपर्यंत माझ्या घरांत राहूं द्या. हिला सार्वभौम लक्षणांनीं युक्त असा मुलगा झाला तर तिला आपण आपल्या जनानखान्यांत घ्यावी. तसें न झाल्यास ही परत आपल्या वडिलांच्याकडे जाईल. दुष्यंतानें तें कबूल केलें. उपाध्यायाच्या मागून शकुंतला रडत जातांना एक अप्सरा आकाशांतून येऊन तिला घेऊन गेली. सगळे आश्चर्य चकित झाले.

६ व्या अंकांत— सुमारें पांच वर्षांनीं एके दिवशीं एक कोळी माशाच्या पोटांत सांपडलेली दुष्यंताचें नांव कोरलेली हिरेजडित आंगठी सराफ कट्ट्यावर विकण्यासाठीं दाखवीत होता. पोलिसांनीं त्याला पकडून ती आंगठी घेऊन दुष्यंत राजाजवळ नेऊन दिली. ती आंगठी पाहतांच दुष्यंताला शकुंतलेची आठवण झाली व तिला कारण नसतां टाकलें, म्हणून पश्चात्ताप झाला. पुढें करमणुकीचे प्रकार दुष्यंतानें सोडून नगरांतील वसंतोत्सव बंद केले. त्याला रात्रीं झोंप येईनाशी झाली. नंतर विदूषकाला बरोबर घेऊन दुष्यंत प्रमदवनांत गेला व तेथें स्वतः काढलेली शकुंतलेची तसबीर आणवून त्याच्याबरोबर तिच्यासंबंधीं गोष्टी बोलूं लागला. दुष्यंत शकुंतलेसंबंधीच्या गोष्टींत इतका गर्क झाला कीं, तसबिरींतील शकुंतला खरी मानून तेथें काढलेल्या भुंग्याला हाकलून लावण्यास तयार झाला. नंतर वसुमति राणी येत आहे असें कळल्यावरून शकुंतलेची तसबीर सांभाळण्यासाठीं विदूषकाजवळ दिली. ती घेऊन विदूषक मेघ-

प्रतिच्छंद नावाच्या राजवाड्यात गेला. धनमित्र नावाचा निपुत्रिक असा सावकार मेल्यामुळें त्याची इस्टेट सरकारजमा करण्याची परवानगी मिळ-विण्यासाठीं प्रधानाकडून लिहून आलें. त्यामधील निपुत्रिकपणाची गोष्ट दुष्यंताच्या मनाला वाईट लागली. आपण निपुत्रिक असल्यामुळें आपले पितर अधोगतीला जाणार ह्या विचारानें त्याला मूर्च्छा आली. मेनकेच्या सांगण्यावरून बागेमध्यें गुप्तपणें राहणाऱ्या सानुमती नावाच्या अप्सरेनें दुष्यंताची अवस्था न्याहाळली व सर्व बातमी पाहिली. नंतर ती शकुंतलेला तें सर्व कळविण्यासाठीं गेली. दुष्यंत मूर्च्छेतून सावध होतो तोंच ' मेलों ! मेलों ! धावा ! धावा !' अशी विदूषकाची वाणी त्याच्या कानावर आली. लगेच तो धनुष्य-बाण घेऊन तिकडे गेला. परंतु कोणीही दिसेना. शेवटीं अदृश्याला वेधणारा बाण धनु-ष्याला लाविला. इतक्यात इंद्राचा सारथि मातलि विदूषकाला सोडून पुढें उभा राहिला, आणि उन्मत्त झालेल्या दैत्यांना ठार करण्याकरितां इंद्राच्या सांगण्यावरून तुला नेण्याकरितां आलों आहे असें म्हणाला. विदूषकाला धरण्याचें कारण दुष्यंताला त्यानें सांगितलें कीं— 'तू शोक-पीडित झालेला मला दिसल्यामुळें तुला चेव आणण्याकरितां मी हा उपाय योजला. दुष्यंतराजा प्रधानावर राज्य सोंपवून मातली बरोबर इंद्राच्या रथावून दैत्यनाशार्थ मदतीसाठीं इंद्राकडे गेला.

७ व्या अंकांत— दैत्यांना ठार करून आणि इंद्राकडून सन्मान मिळवून, मातलीसह इंद्राच्या रथावून पृथ्वीवर येतांना वाटेंत देवांचीं माता-पितरें, दाक्षायणी व मारीच, यांच्या दर्शनासाठीं दुष्यंतराजा हेमकूट पर्वतावर उतरला दर्शनाची सधी पाहून दुष्यंतराजाची वर्दी देण्याकरितां मातली आश्रमांत गेला. दुष्यंतराजा अशोकाच्या झाडा-

पूर्ण झाल्याबद्दल अभिनंदन केलें. मारीच व दाक्षायणी दर्शन देण्याला तयार आहेत, लवकर चलावें असें सांगितलें. नंतर दुष्यंत, शकुंतला, मुलगा सर्वदमन, ह्या तिघांनीं मारीच--दाक्षायणींना नमस्कार केला, त्यांनीं सगळ्यांना आशीर्वाद दिले. शकुंतलेला पाहून सुद्धां आठवण होईना परंतु आंगठी दिसल्याबरोबर सर्व आठवूं लागलें. ह्याचें कारण दुष्यंतानें मारीचाला विचारलें. तेव्हां त्यांनीं दुर्वास ऋषींच्या शापाची हकीकत सांगितली. त्यामुळें शकुंतलेचा दुष्यंताबद्दलच्या कठोरपणाच्या वागणुकीबद्दल झालेला गैरसमज नाहींसा झाला. मारीचानें ती आनंदाची बातमी मुद्दाम शिष्य धाडून कण्वऋषींना कळविली. शेवटीं दुष्यंतराजा शकुंतला, सर्वदमन, ह्यासह इंद्राच्या रथांतून आपल्या राजधानीस आनंदानें आला.

---

## बाणभट्टकृत कादंबरीपरिचय.

(इ. स. ७ शतक)

पिता—चित्रभानु माता— राजदेवी. बाणाची आई लहानपणींच वारली. त्यामुळें चित्रभानूनें बाणाचें लालनपालन केलें. बाणाच्या वयाच्या १४ वर्षी चित्रभानु वारला. आश्रय—सम्राट हर्षवर्धन (जन्म इ. स. ५९०, यानें इ. स. ६०६ ते ६४८ पर्यंत राज्य केलें) यांच्या आश्रमांत बाणभट्टास कीर्ति, संपत्ति, पदवी मिळून कार्य करतां आलें. वैशिष्ट्य—बाणभट्टाचें गद्य, उपमा, उत्प्रेक्षा, रूपक, वगैरे निरनिराळ्या अलंकारांनीं युक्त, तसेंच मनोरंजक वर्णनें, मधुरवाणी, सुंदर कल्पना, पल्लेदार समास, यांनीं युक्त असें आहे.

इंग्लिशमध्यें ज्याला रोमान्स म्हणतात तसा **कादंबरी** हा ग्रंथ अद्‌भुत कथांच्या वर्गात मोडेल. यांत **कादंबरी** ही नायिका आहे. ही गंधर्व कुलांतील असून उज्जयिनी नगरीच्या राजाच्या **चंद्रापीड** नांवाच्या मुलाशीं हिचें लग्न होतें. हा राजपुत्र दिग्विजयाच्या प्रसंगानें हिमालयावर कैलासपर्वताच्या जवळ तळ देऊन राहिला होता. एके दिवशीं शिकारीच्या नादांत गंधर्वांच्या प्रदेशांत तो एकटाच शिरला. पुढें **महाश्वेतेची** व कादंबरीची त्याची भेट झाली. या कथेंतील **महाश्वेता** उपनायिका असून कादंबरीची मैत्रिण आहे. हिनें **पुंडरीक** नांवाच्या ऋषीच्या मुलाला वरलें होतें. हाच दुसऱ्या जन्मांत चंद्रपीडाचा **वैशंपायन** म्हणून मित्र झाला. कथेच्या आरंभीं मांगाची मुलगी ज्या पोपटास घेऊन **शूद्रक** राजाकडे आली आहे तोच हा पोपट होय.

**विशेष**—कादंबरींतील पुढील वर्णनें महत्वाचीं आहेत. शूद्रक राजाच्या स्नानसमारंभाचें वर्णन. कादंबरी व चंद्रापीड यांच्या पहिल्या भेटीचें वर्णन. अच्छोदसरोवर वर्णन. शुकनासाचा चंद्रापीडाला उपदेश. राज्यलक्ष्मी वर्णन.

**संगीत**—सामवेदांतील मंत्रांचे गायनाकडे वळलेलें पठण हेंच संगीताचें उगमस्थान आहे. यज्ञामध्यें 'ऋचा' गाण्याची चाल आर्यांनीं चालू ठेवून यज्ञासारख्या धार्मिक कृत्यामध्यें सामरूपी संगीताला मुख्य मान दिला.

**गीतरूपाः मंत्राः सामानि ।** गेय मंत्रांना साम म्हणतात. नंतर गायनशास्त्र बनून तें कायम राहण्यासाठीं पाठांतर करण्याची चाल सुरूं झाली. यज्ञांत 'उद्गाता' नांवाचा सामगायक मुख्य असतो व त्याला प्रस्तोता, प्रतिहर्ता या नांवाचे साथिदार 'होऽऽऽ' असा खर्ज

स्वर देऊन त्याच्या गायनाला तंबोऱ्या सारखा आधार देतो. छांदोग्य-उपनिषद्, सामसंहिता, ताण्ड्यब्राह्मण, नारदीशिक्षा वगैरे ग्रंथ महत्त्व-पूर्ण आहेत.

**गीताचे भाग**— १ हिंकार. २ प्रस्ताव. ३ उद्गीथ. ४ प्रति-हार. ५ निधन. हे भाग हल्लीच्या धृपद गायन पद्धतींतील अनुक्रमें 'नोमतोम्' स्थायी, अंतरा, संचारी, आभोग, या पांच भागाप्रमाणें घालतात.

**साम गायनाचें ध्येय**— गाणें हें केवळ लोकरंजन व कीर्ति या करितां नसून आत्मानंदपूर्णतेच्या अंतिम अवस्थेची सिद्धि मिळवि-ण्याचें साधन आहे. ( छांदोग्य ) **श्वन्दगान**— 'शौव साम' नांवाचें एक साम यज्ञामध्यें यजमानाबरोबर सर्व ऋत्विजांनीं यज्ञाच्या भोंवती प्रदक्षिणा घालीत असतांना गावयाचें असतें. ती चाल कोणी सुरू केली या विषयीं लहान कथा आहे.—बकदाल्भ्य व मैत्रेयग्लाव या ऋषींनी एकदां एका पांढऱ्या कुत्र्याबरोबर पांढरे कुत्रे एके ठिकाणीं जमून अन्नाकरितां ईश्वराची प्रार्थना करीत आपआपल्या निरनिराळ्या सुरांत गात आहेत असें पाहिलें. तेव्हां यज्ञांतही आपण सामुदायिक प्रार्थना करावी या हेतूनें 'साम' तयार केलें. व यज्ञामधील सामगायनाचा प्रकार घातला पुढें तो लोकप्रिय झाला. ही चाल पुढें देवपूजेच्या मंत्रपुष्पात आली. नंतर त्याचें हल्लीं 'वन्देमातरम्' हें स्वरूप बनलें.

**संगीताचे ग्रंथ**— संगीतमकरंद ( नारदकृत ). संगीतरत्नाकर ( श्री शार्ङ्गदेवकृत.) **रागतरंगिणी**— लोचनकविकृत. **रागविबोध**— ( सोमनाथपंडित ). संगीतपारिजात ( अहोबल पंडित ). नारदीशिक्षा.

**मराठी**— भारतीय संगीत लेखक व प्रकाशक कृ. ग. मुळे. वीणा-वादन संगीत विद्यालय पोर्तुगीजचर्च रोड, दादर मुंबई किं. २ रु.
**हिंदुस्थानी संगीतपद्धति**— लेखक विष्णुशर्मा भातखंडे.

---

## ज्योतिषपरिचय

**ज्योतिषव्याख्या**— ज्योतिष हें आकाशांतील ज्योतींचें म्हणजे आकाशांत चमकणाऱ्या ताऱ्यांचें व त्यावरून जाणाऱ्या ग्रहांचें शास्त्र होय. सर्वगोष्टींवर प्रभुत्व चालविणाऱ्या व आकाशांतील ग्रहांच्या साहाय्यानें व्यक्तिमात्राचर आपले बरेवाईट परिणाम घडविणारा **काल आपणांस अनुकूल किंवा प्रतिकूल आहे हें सोपपत्तिक पाहण्याच्या साधनाला ज्योतिष** ( गणिताधारें निर्णयात्मक सिद्धांत ) **असें म्हणतात.**

**प्रकार**–सिद्धांत, संहिता, होरा–(गणितज्योतिष फलज्योतिष. ( ग्रहफल मापण्याचें एक शास्त्र.) होरा किंवा जातक, प्रश्न, मुहूर्त, संहिता मेदिनीय फलज्योतिष. ):

– **रमलज्योतिष**—हे ज्योतिष मुसलमानांनी निर्माण करून प्रश्नांचे अचूक फल सांगतां येतें असें सिद्ध केलें आहे. त्यामुळें हें ज्योतिष फार लोकप्रिय झालें. हिंदूंना तें ज्योतिष कळावें म्हणून एका विद्वान ब्राह्मणानें मुसलमान धर्म पत्करून अरबी भाषेतील ग्रंथांचा अभ्यास करून त्यावर संस्कृतांत ग्रंथ रचला—रमविणारे म्हणून रमल.

**ग्रंथ**—रमलनवरत्न– परमसुखोपाध्याय विरचित. उज्जयनींत संवत १८६७ मध्यें लिहिला.

**महत्त्व**— धार्मिक कृत्याचा योग्य काळ, भूकंप, पाऊस, पिकें, रोग, साथी वगैरे सार्वजनिक बऱ्यावाईट गोष्टी व व्यक्तिविषयक सुख-दुःखें याचें ज्योतिषशास्त्रानें ज्ञान होतें. ग्रह ९— रवि, चंद्र, मंगळ, बुध, गुरु, शुक्र, शनि, राहु, केतु, हर्शल (प्रजापति), नेपच्युन (वरुण) हे दोन ग्रह युरोपियन ज्योतिषी विचारात घेतात.

**कुंडली व्याख्या**—'जन्मकालीं आकाशातील ग्रहांची स्थिति दाखविणारा नकाशा' यास कुंडली म्हणतात.

**कुंडली प्रकार**— १ प्रश्नकुंडली, २ जन्मकुंडली, ३ राशि-कुंडली, ४ वर्ष (लग्न) कुंडली, अशा चार प्रकारच्या कुंडल्या असतात.




**पंचांगव्याख्या**— १ तिथि, २ वार, ३ नक्षत्र, ४ योग, ५ करण. या पाच गोष्टी ज्यात आहेत त्यास पचांग म्हणतात. टीप— योग– विष्कंभ, प्रीति, आयुष्मान्, सौभाग्य, व्यतिपात, शुभ, वैधृति, वगैरे २७ योग आहेत. करण— बव, बालव, कौलव, तैतिल वगैरे.

**प्राचीन ज्योतिषि**— गर्ग, पराशर, भृगु, वसिष्ठ, बृहस्पति, वगैरे आर्यभट्ट, वराहमिहिर, लल्ल, श्रीषेण, ब्रह्मगुप्त, भास्कराचार्य, वेंकटेश बापूजी केतकर, लोकमान्य टिळक– (ग्रंथ–ओरायन), शं. बा. दीक्षित इत्यादि वगैरे. युरोपियन–रॅफेल.

ग्रंथ-संस्कृत— बृहज्जातक, आर्यसिद्धांत, लीलावती, सिद्धांतशिरोमणि, करणकुतूहल वगैरे.

मराठी— बालबोधज्योतिष—य. के. प्रधानकृत, किं. ६ आ.

मेदिनीय ज्योतिष— रामनारायण, किं. १२ आ. सुलभज्योतिषशास्त्र—कृ. वि. सोमण, किं. २ रु. ८ आ. प्रकाशक—के. भि. ढवळे, मुंबई. ज्योतिषशिक्षक अथवा जातककेसरी-पं० रघुनाथशास्त्री पटवर्धन किं. २० रुपये. भविष्यसिद्धांत-पंडित रघुनाथशास्त्री पटवर्धन किं. १० रु. सामुद्रिकतिलक-पंडित पटवर्धनशास्त्री किं. १२ रु.

शिक्षणसंस्था— ज्योतिषशिक्षण महाविद्यालय पुणें, १४०शुक्रवार पेठ, [ पं० रघुनाथशास्त्री पटवर्धन यांचें. ]

---

## शिल्पशास्त्रपरिचय [ इंजिनियरिंग ]

शिल्पाची व्याख्या— शिल्पाचा उपयोग माणसांना भोग मिळवून देण्यासाठीं होतो. जगांत माणसाला उपयोगी पडणाऱ्या अनेक वस्तु आहेत, परंतु त्या लागलीच उपयोगांत आणतां येत नाहीत. जेव्हां त्या वस्तूंना उपयोगी पडण्यासारखें स्वरूप यावें तेव्हां त्या उपयोगी पडतातः वस्तूला उपयोगाच्या दृष्टीनें योग्य स्वरूप देण्याच्या क्रियेला शिल्प म्हणतात. शिल्पशास्त्र—शिल्पसंहितेंत दहा शास्त्रांचा अंतर्भाव होतो. १ कृषिशास्त्र— या शास्त्रांत झाडें, पशु, माणसें, यांची शरीररचना व गुणधर्म कोणते, त्यांस योग्य वळण कसें लावावें व त्यांचा उपयोग कसा व कोठें करावा हें सांगितलें

आहे. २ जलशास्त्र—पाणी कसें मिळवावें व तें योग्य ठिकाणीं कसें न्यावें, जास्त झालेलें पाणी काढून कसें लावावें, पाण्यापासून निरनिराळीं कामें कशीं करून ध्यावींत हें या शास्त्रात सांगितलें आहे. ३ खनिशास्त्र— या शास्त्रात खाणींतल्या मातीपासून धातूपर्यंत पदार्थ कसे काढावेत व ते शुद्ध कसे करावेत, त्यांचे गुणधर्म कोणते, चांगले गुण प्राप्त होण्यासाठीं अनेक पदार्थ एके ठिकाणीं कसे मिसळावेत, मिसळलेल्या पदार्थांतून घटक द्रव्यें पुन निराळीं कशीं काढावींत हें सांगितलें आहे. ४ नौकाशास्त्र— या शास्त्रात पाण्याचे गुणधर्म कोणते, त्यावर कसें तरावें व तरण्यासाठीं तराफे, नावा, जहाजें कशीं तयार करावीत हें सांगितलें आहे. ५ रथशास्त्र— या शास्त्रात जमीनीवरून माल इकडून तिकडे कसा न्यावा, त्याकरिता रस्ते, पूल, धाट, बोगदे, कसे बांधावेत, गाड्या वगैरे कशा तयार कराव्यात हें सांगितलें आहे. ६ विमानशास्त्र— या शास्त्रात किल्ल्याला वेढा पडून आजूबाजूला आग लागली तर त्यावरून कसें उडून जावें, विमान कसें तयार करावें, तें कसें चालवावें हें सांगितलें आहे. ७ वास्तुशास्त्र— या शास्त्रात ऊन, वारा, पाऊस इत्यादिकांपासून माणसाचें रक्षण व्हावें, झोंपडी पासून तों राजवाडा-देवीलेण्यापर्यंत निवाऱ्याच्या जागा कशा तयार कराव्यात हें सांगितलें आहे ८ प्राकारशास्त्र— ह्या शास्त्रात क्रूर पशु, जंगली लोक यांच्यापासून आपलें रक्षण कसें करावें व त्रास देणाराचा नाश कसा करावा हें सांगितलें आहे. ९ नगररचनाशास्त्र— या शास्त्रात गावें, शहरें, बंदरें, राजधान्या कशा वसवाव्यात, गावांत कोणत्या सोई असाव्यात, व व्यवस्था कशी ठेवावी हें सांगितलें आहे. १० यंत्रशास्त्र— या शास्त्रात माणसें, जनावरें याच्यामुळें

अवजड कामें कशीं करून घ्यावीत, पाणी, वारा, अग्नि यांच्या शक्तींची मदत या कामीं कशी घ्यावयाची हें सांगितलें आहे.

शिल्पशास्त्रांत बैल, रेडे, घोडे, हत्ती, बकरें, कुत्रीं, यांत चांगलीं वाईट कोणतीं याची पुढीलप्रमाणें कांहीं थोडी माहिती आहे.

**उत्तम बैल**— पांढऱ्या रंगाचे, स्वच्छ राहणारे, रागीट नसलेले, स्पर्शाला मऊ, शुद्धमनाचे, थोडें खाणारे, बलवान, असे बैल उत्तम होत.

शुक्लाङ्गाः शुचयोऽक्रुद्धा मृदवः शुद्धचेतसः ।
अल्पाशिनो बहुबला वृषभा ब्रह्मजातयः ॥

**वाईट बैल**— कोणच्या तरी अंगानें कमी, बेरंगी, बेढब, उभ्या शिंगांचा, ज्याचा दांत, शिंग, खूर, वगैरे हालत आहेत असा, खूर, नाकपुड्या, पाय, लांब-आखूड असून जीभ-पांढरी असा— असे बैलांचे सात दोष सांगितले आहेत.

व्यङ्गो विवर्णो विषमः श्विन्नी ऋमश्चलः खरः ।
एते सप्त महादोषा वृषभाणामुदीरिताः ॥

**घोडा**— विचारी, दयाळू, असा घोडा उत्तम. तेजस्वी व बलवान असा घोडा मध्यम. मंद असा साधारण. दम नाहीं असा घोडा वाईट.

विवेका सघृणो विप्रः, तेजस्वी क्षत्रियो बली ।
कोष्णभावो भवेद्वैश्यः, शूद्रो निःसत्वको भवेत् ॥

**घोड्यांचे भेद**— वाटेल तेव्हां कामाला तयार तो अश्व होय. घाईनें चालतो तो **तुरंगम** होय. ( थोड्या वेळांत पुष्कळ पावलें टाकणें म्हणजे त्वरा ) जोरानें चालतो तो **वाजी** होय. खेकाळत जाणारा **हय** होय.

सद्यः कारी भवेदश्वः त्वरया च तुरङ्गमः ।
घण्टवेगो भवेद्वाजी शब्दकारी हयः स्मृतः ॥

घोड्याला केव्हां कशी शिक्षा करावी— घोडा भीत असल्यास त्याला छातीवर मारावें, उधळत असला तर तोंडावर मारावें, रागावला असला तर ढुंगणावर मारावें. बुजत असल्यास गुडघ्यावर मारावें.

भीते वक्षःस्थलं हन्यात्, वक्त्रं चोन्मार्गगामिनः ।
कुपिते पुच्छसंस्थानं, भ्रान्ते जानुद्वयं तथा ।

हत्ती:—शरीरानें मोठे, स्वच्छ राहणारे व थोडे खाणारे हत्ती उत्तम होत. विशालाक्षाः पवित्राश्च भद्रकाः स्वल्पभोजिनः ।

पालकाप्य नावाच्या मुनीनें 'हस्त्यायुर्वेद' नांवाचा ग्रंथ केला आहे. त्यांत हत्तीच्याबद्दलची सविस्तर माहिती आहे. हा ग्रंथ आनंदाश्रम, पुणें, या संस्थेनें छापला आहे. रेडे—काळेढोण, स्वच्छ, नाक व अंड मोठे असलेले, थोडे खाणारे, मारकट नसलेले रेडे उत्तम होत.

भृशं कृष्णाः पवित्राश्च बृहत्वृषण-घोणकाः ।
अल्पाशिनोऽमारकाश्च महिषा भद्रजातयः ॥

बोकड—जे बोकड पांढरे व स्वच्छ असतात ते उत्तम होत.
ये अकृष्णाः शुचयः छागाः ते उत्तमाः ।

कुत्रे—पांढऱ्या रंगाचे, उंचट, उभ्या कानाचे, आखूड शेपटीचे, पातळ पोटाचे, पांढऱ्या व तिखट दांताचे कुत्रे उत्तम होत.

शुभ्रा दीर्घा स्तब्धकर्णा लघुपुच्छास्तनूदराः ।
सशुक्लखरदन्ताश्च श्वानस्ते भद्रजातयः ॥

**नौकेचे गुण**—हलकेपणा, मजबुती, अणीदारपणा, भोकें नसणें, कोणत्याही बाजूला न कलंडणें, हे गुण नावेंत पाहिजेत.

> लघुता दृढता चैव गामिताऽछिद्रता तथा ।
> समतेति गुणोद्देशो नौकायां संप्रकाशितः ॥ युक्तिकल्पतरु.

**यान**—जमीनीवरून जाणारीं जीं यानें त्यांना **'भूमियान'** म्हणतात. ( रथ, गाडी वगैरे ). पाण्यावरून चालणारें जें यान तें **'जलयान'** ( नाव वगैरे ). विस्तवावरून चालणारें किंवा आकाशांतून चालणारें त्याला **अग्नियान** किंवा **व्योमयान** म्हणतात.

> अश्वादिकं तु यद्यानं भूमियानं स्थले स्थितम् ।
> जले नौकेयुयानं तज्जलयानमिति स्मृतम् ।
> अग्नियानं विमानं स्यात् व्योमयानं तदेव च ।

भृगुसंहिता अ. ५

**घराचा उपयोग**—पावसाच्या तडाख्यापासून, पाण्याच्या लोंढ्यापासून, जनावरांच्या पीडेपासून, वाऱ्याच्या त्रासापासून, सूर्याच्या प्रखरतेपासून, उंदीर, चोर व शत्रू यांच्या भयापासून, तात्पर्य—सर्व स्थावर व जंगम यापासून आंत राहणारांचे संरक्षण व्हावें हा घराचा उपयोग होय.

> धारा निपातसलिलप्रकोपात् दंष्ट्रानिपातात्पवनप्रकोपात् ।
> सूर्यस्य तापान्मुषिताच्च चोरात् रक्षेग्दृहं सर्वचराचरेभ्यः ॥

मयमत

**शस्त्र**—ज्याला हातांत धरूनच शत्रूला घायाळ करतां येतें त्याला 'शस्त्र' असें म्हणतात. जसे—तरवार, कुऱ्हाड, गदा, भाला, पहार, काठी. **अस्त्र**—ज्याला फेकून शत्रूला घायाळ करतां येतें त्याला 'अस्त्र' म्हणतात—जसे—बाण, चक्र, शूल, शक्ति, बंदुक, तोफेचा गोळा, बॉंब.

अस्त्रांचे भेद—

> खड्ग चर्म धनुर्बाणौ शल्य भल्लौ तथा परौ ।
> अर्धचन्द्रश्च नाराचः शक्तियष्टी तथा परे ।
> परशुश्चक्रशूलेच परिघश्चैवमादयः ।
> अस्त्रभेदाः समुद्दिष्टाः श्रीमद्भोजमहीभुजा ॥ युक्तिकल्पतरु

अग्न्यस्त्र—ज्वालाग्राही तापलेल्या तेलाच्या योगानें आगी लावणारें 'अग्न्यस्त्र' होय. संमोहनास्त्र—लोकांना बेशुद्ध करणारे ( क्लोरोफॉर्म ) सारखी द्रव्यें अंगावर टाकणारें 'संमोहनास्त्र' होय. नारायणास्त्र हल्का वायू सोडून बेजार करणारें 'नारायणास्त्र' होय. तिमिरास्त्र—डोळ्यांना पाणी आणून आंधळे करणारें 'तिमिरास्त्र' होय. पाशुपतास्त्र अनेक प्रकारची भीतिदायक स्वरूपें व आवाज करणारें 'पाशुपतास्त्र' होय. इंद्रास्त्र—एका बाणांतून दुसरे अनेक बाण सोडणारें 'इंद्रास्त्र' होय.

तरवारीचे गुण—लांब, हलकी, मोठ्या आवाजाची, बळकट, मोडली तर सांधली जाणारी हे तरवारीचे गुण होत.

> दीर्घता लघुता चैव स्वरविस्तीर्णता तथा ।
> दुर्भेद्यता सुघटता खड्गानां गुणसंग्रहः ॥ युक्तिकल्पतरु

धनुष्य—धनुष्यें दोन प्रकारची असतात. १ शिंगाचें ( शार्ङ्ग ) २ वांबूचें. धनुष्य लवचिक व मजबूत असावें. हे त्याचे दोन गुण आहेत.

> धनुस्तु द्विविधं प्रोक्तं शार्ङ्गवांशं तथैव च ।
> कोमलं घर्षणदृढता गुणौ तस्य उदाहृतौ ॥ युक्तिकल्पतरु

बाण—बाण हलके, मजबूत व तीक्ष्ण धारेचे असावेत. प्रकार—बाण, शर, भल्ल, अर्धचंद्र, नाराच, शक्ति, यष्टि.

गुप्तहेर—तर्काने मनांतील ओळखणारा, आठवण असलेला, आपल्या मनांतील हेतु कळूं न देणारा, दुःख व कष्ट सुखान्याने सोसणारा, सावध, कोठेही, केव्हांही न घाबरणारा.

तर्केङ्गितः स्मृतिमान् स्वीयभावाप्रकाशकः ।
क्लेशायाससहोदक्षः सर्वत्र भयवर्जितः । युद्धजयार्णव

**शिल्पशास्त्राचे आचार्य**—१ भृगु २ अत्रि ३ वसिष्ठ ४ विश्वकर्मा ५ मय ६ नारद ७ नग्नजित् ८ विशालाक्ष ९ पुरंदर १० ब्रह्मा ११ कुमार १२ नंदीश १३ शौनक १४ गर्ग १५ वासुदेव १६ अनिरुद्ध १७ शुक्र १८ बृहस्पति. युरोपियन शिल्पज्ञ—थॉर्डन्, हॅवेल ग्रिफिथस्, हीरेन्, डॉलवर्क. **शिल्पाचे संस्कृत ग्रंथ**—शिल्परत्न (श्रीकुमारकृत). शिल्पसंहिता, भृगुसंहिता. **मराठी**—प्राचीन हिंदी शिल्पशास्त्रसार, के. रावसाहेब कृ. वि. वझेकृत.

---

## अर्थशास्त्रपरिचय

**अर्थशास्त्र**— शेतकी, पशुपालन, व्यापार, यांना अर्थशास्त्र (वार्ता) असें म्हणतात. ( कृषिपशुपाल्ये वणिज्या च वार्ता । कौटिलीय अर्थशास्त्र, अध्याय ४). **महत्त्व**— धर्म व काम हे संपत्तीवर अवलंबून आहेत. ( अर्थमूलौ धर्मकामौ । कौ. अध्याय ७ ) **विषय**— कौटिलीय अर्थशास्त्रांत १५ अधिकरणें आहेत. ( १ ) अधिकरण १ यामध्यें विद्येचा उद्देश व उपयोग, अर्थशास्त्राचा व दंडनीतीचा विचार, वृद्ध माणसाच्या संगतीचा फायदा, स्थायिक व फिरता हेर, यांची योजना, राजाच्या दिनचर्येचें वर्णन, राजवाड्याचा बंदोबस्त, इत्यादि वर्णन

आहे. ( २ ) अधिकरण २ मध्यें गाव वसविणें, जमिनीचे भाग करणें, किल्ला बांधणें, कचेरी व हिशेब ठेवण्याचें काम, खाणींचा उपयोग, अधिकाऱ्याची परीक्षा, वजनें-मापें-याचीं कोष्टकें, सूतकाम, शेतकी, दारु, कसाई याच्यावर अधिकारी, वेश्या, सेनापतीचें काम, शहरकामदाराचीं कामें, इत्यादिकांची माहिती आहे. ( ३ ) अधिकरण ३ मध्यें करारनामें, विवाहसंबंध, कर्जवसुली, ठेव, नोकराचे नियम, दरोडाचोरी-मारहाण, अनुकसान, जुगार यावर शिक्षा, इत्यादि वर्णन आहे. ( ४ ) अधिकरण ४ मध्यें संशयास्पद व उडाणटप्पू अशा लोकांचा बंदोबस्त, एकदम येणाऱ्या आपत्तींच्या निवारणाच्या युक्त्या, अत्याचारावर शिक्षा, सरकारी अधिकारी व त्यांचे अपराध. ( ५ ) अधिकरण ५ मध्यें प्रसंगानुरूप वर्तन करें असावें. ( ६ ) अधिकरण ६ मध्यें शासन व उद्योग यांची माहिती आहे. ( ७ ) अधिकरण ७ मध्यें समान, कनिष्ठ, वरिष्ठ, या लोकांचें गुणवर्णन, तहाची माहिती, दुर्बळानें सबल होण्याचा उपाय इत्यादि माहिती आहे. ( ८ ) अधिकरण ८ मध्यें माणसाचे दुर्गुण, सैन्य व मित्र याचे दोष वगैरे माहिती आहे. ( ९ ) अधिकरण ९ मध्यें शत्रूवर स्वारी, सैन्याची उभारणी, सैन्याचें शिक्षण, व्यूहरचना. ( १० ) अधिकरण १० मध्यें युद्धाविषयीं माहिती आहे. लष्करी छावणी, सैन्याचे कूच, संकटाच्या वेळीं आणि हल्ल्याचे वेळीं संरक्षणाच्या युक्त्या, सैन्याला प्रोत्साहन देणें, पायदळ, घोडदळ, रथदळ, हत्तीदळ, यांची कार्यें, जोरदार व कमजोर अशा सैन्याची रचना. ( ११ ) अधिकरण ११ मध्यें संघाचें वर्णन, भेदाचा प्रयोग, गुप्त शिक्षा. (१२) अधिकरण १२ मध्यें दूतकार्य, शस्त्र-अग्नि, विषप्रयोग, यांचा उपयोग. ( १३ ) अधिकरण १३ मध्यें शत्रूचा

नायनाट, मिळविलेले राखणें वगैरे माहिती आहे.

---

## अर्थशास्त्रांतील सुभाषितें

**विद्याप्रभाव**—१ आज्ञापाळणें २ अभ्यास ३ ग्रहणशक्ति ४ धारणशक्ति ५ विचार ६ तर्कशक्ति ७ तत्त्व जाणणारी बुद्धि हे गुण अंगी असलेल्यालाच विद्या चांगला मार्ग दाखवूं शकते. इतराला दाखवूं शकत नाही. ( शुश्रूषा–श्रवण–ग्रहण–धारण–विज्ञान–ऊहापोह–तत्त्वाभिनिविष्टबुद्धिं विद्या विनयति नेतरम् । कौ. अध्याय ५ ) **विद्यार्थ्यांची दिनचर्या**—सकाळीं हत्ती–घोडा–रथ यांवर बसावयाला शिकणें, व त्यांच्या संबंधीच्या शास्त्राचा अभ्यास करणें, आयुध वापरण्याचा अभ्यास करावा. दुपारीं इतिहासाचा (पुराणें, बखरी, आख्यायिका, धर्मशास्त्र, अर्थशास्त्र ) अभ्यास करावा. बाकी राहिलेल्या भागांत नवीन शिकणें व जुन्या अभ्यासाची उजळणी करावी. त्याचप्रमाणें अर्धवट झालेला विषय घोटून तयार करावा. पूर्वमहर्भागं हस्त्यश्वरथप्रहरण विद्यासु विनयं गच्छेत् । पश्चिममितिहासश्रवणे । पुराणमिति वृत्तमाख्यायिकोदाहरणं धर्मशास्त्रमर्थशास्त्रं च इतिहासः । शेषमहोरात्रभागमपूर्वग्रहणं, गृहीतपरिचयं च कुर्यात् । अगृहीतानाम् आभीक्ष्ण्यश्रवणं च । **विद्यासामर्थ्य**—श्रवणामुळें बुद्धि वाढते, बुद्धिपासून श्रद्धा उत्पन्न होते, श्रद्धेनें आत्मविश्वास वाटूं लागतो हेंच विद्येचें सामर्थ्य आहे. श्रुताद्धि प्रज्ञोपजायते, प्रज्ञया योगः, योगात् आत्मवत्ता, इति विद्यासामर्थ्यम् । कौ. अध्याय ५.

**राजकर्तव्य**—प्रजेचें सुख हेंच राजाचे सुख, प्रजेचें हित हेंच राजाचें हित, आपल्या इच्छेची तृप्ति करण्यांत राजाचें कल्याण नसतें. तर प्रजेच्या इच्छेप्रमाणें वागण्यांत त्याचें कल्याण असतें.

प्रजासुखे सुखं राज्ञः प्रजानां च हिते हितम् ।
नात्मप्रियं हितं राज्ञः प्रजानां तु प्रियं हितम् ।

**उद्योग**—( १ ) उद्योग हा द्रव्यसाधनाचें मूळ कारण आहे आणि त्याच्या उलट आळस हा अनर्थाचें बीज आहे.

अर्थस्य मूलमुत्थानमनर्थस्य विपर्ययः । कौ. अध्याय १९.

( २ ) उद्योगामुळें फलप्राप्ति होते व संपत्ति मिळते.

प्राप्यते फलमुत्थानात् लभते चार्थसम्पदम् । कौ. अध्याय १९.

**उद्योग न करण्याचा परिणाम**—उद्योग न केल्यास जवळ असलेल्या व पुढें मिळावयाच्या संपत्तीचा नक्की नाश होईल.

अनुत्थाने ध्रुवो नाशः प्राप्तस्यानागतस्य च । कौ. अध्याय १९.

**लेखाचे गुण**—( १ ) अर्थक्रम—कार्याचा क्रम राखणें व महत्त्वाचा मजकूर आरंभीं लिहिणें याला 'अर्थक्रम' म्हणतात. यथा यदनुपूर्वक्रियाप्रधानस्यार्थस्य पूर्वमभिनिवेशः इति अर्थक्रमः ।

( २ ) वाक्यसंबंध—आरंभापासून शेवटपर्यंत अगोदर लिहिलेल्या मजकुराचा पुढच्या भागाशी विरोध न येणें. प्रस्तुतस्य अर्थस्य अनुपरोधात् उत्तरस्य विधानम् आसमाप्तेः इति वाक्यसम्बधः । ( ३ ) परिपूर्णता—अर्थ, पदें, अक्षरें, हीं वाजवीपेक्षां कमी किंवा जास्त नसणें, हेतु, दृष्टांत, उदाहरण, वगैरे देऊन अर्थाचा खुलासा करणें ह्याला 'परिपूर्णता' म्हणतात. अर्थपदाक्षराणाम् अन्यूनातिरिक्तता, हेतु-उदाहरण-दृष्टान्तैः अर्थोपवर्णना-अश्रान्तपदता इति परिपूर्णता ।

**माधुर्य**—कानाला गोड लागणारें व सुंदर अर्थाचे शब्द योजणें याला 'माधुर्य' म्हणतात. सुखोपनीतचार्वर्थं शब्दाभिधानं माधुर्यम्। **गौरव-निःसंदेहपणा ( स्पष्टपणा )**—व्यवहारांतील शब्दांचा उपयोग करणें. प्रतीत शब्दप्रयोगस्पष्टत्वम्. **लेखदोष**—( १ ) **कळाहीनपणा**—१. शाईचे डाग पडणें, २ बेढब, ३ लहान-मोठीं-अस्पष्ट-अशी अक्षरें लिहिणें. कालपत्रकम्, अचारु-विषम-विरागाक्षरत्वमकान्तिः। ( २ ) **व्याघात**—पहिल्या वाक्याचा दुसऱ्या वाक्याशीं विरोध येणें. पूर्वेण पश्चिमस्य अनुपपत्तिः व्याघातः ( ३ ) **पुनरुक्ति**—कारण नसतां एकदां लिहिलेलें पुनः लिहिणें. उक्तस्याविशेषेण द्वितीयमुच्चारणं पुनरुक्तम्। ( ४ ) **अपशब्द**— लिंग, वचन, काळ, कारक, यांच्यांत चूक करणें. लिङ्गवचनकालकारकाणामन्यथा प्रयोगोऽपशब्दः। (५) **अक्षरांचा घोटाळा** ( सम्प्लव )—शब्द तोडावयाचे तें न तोडणें, न तोडावयाचे ते तोडणें, व इतर अव्यवस्था. अवर्गे वर्ग करणं, वर्गेचा-वर्गक्रिया, गुणविपर्यासः सम्प्लवः। कौ. अध्याय २१.

**चाणक्यसूत्रांतील निवडक सूत्रें**— १ वृद्धांच्या सेवेमुळें अनुभवजन्यज्ञान मिळतें. ( वृद्धसेवायाः विज्ञानम्। ) २ विद्येनें मिळालेली कीर्ति हीच खरी प्रसिद्धि. ( विद्यया ख्यापिता ख्यातिः।२९७.) ३ कीर्तिरूपी देह नाहिसा होत नाहीं. ( यशः शरीरं न नश्यति। २९८ ). ४ शिष्यानें गुरूच्या आज्ञेप्रमाणें वागावें. ( गुरुवशानुवर्ती शिष्यः। ३३७ ). ५ मुलानें वडिलांच्या आज्ञेप्रमाणें वागावें. ( पितृवशानुवर्ती पुत्रः। ३३८ ). ६ विनय-शीलता असून विद्या असणें हें सर्व भूषणांचें भूषण होय. ( भूषणानां भूषणं सविनया विद्या ३६८ ). ७ गुणवान् पुत्र असणें [illegible] संसारी माणसाचा स्वर्ग होय.

( पुत्रे गुणवति कुटुंबिनः स्वर्गः । ३८१ ). ८ पुत्रांना विद्येंत पारंगत करावें. ( पुत्राः विद्यानां पारं गमयितव्याः ). ९ निर्धन माणसाला विद्या हेंच धन आहे. ( विद्याधनमधनानाम् २९५ ). १० मित आहार म्हणजे शरीरस्वास्थ्य. ( मित भोजनं स्वास्थ्यम् । २१८ ). ११ थोर पुरुषाची थट्टा करूं नये. ( न महाजनहासः कर्तव्यः।३२१). १२ कारणावाचून दुसऱ्याचें घरीं जाऊं नये. ( परगृहमकारणतो न प्रविशेत् । ४६७ ). १३ आपली आपण स्तुति करूं नये. ( आत्मा न स्तोतव्यः । ५०९ ). १४ दुष्टबुद्धि मनांत येऊं देऊं नये. ( खलत्वं नोपेयात् । ४२३ ). १५ गुरुजनांच्या वर्तनाची मीमांसा करूं नये. ( न मीमांस्या गुरवः । ४२२ ). १६ धर्म [illegible] व्यवहाराला धरून असला पाहिजे. ( व्यवहारानुलोमो धर्मः । ५४१ ). १७ सत्याहून श्रेष्ठ कोणतेंही तप नाही. ( नास्ति सत्यात्परं तपः । ४१७). १८ सत्यानेंच समाजाचें धारण होतें. ( सत्येन धार्यते लोकः । ४१९ ). १९ जेथें शास्त्राचें वचन नसेल तेथें शिष्टाचाराप्रमाणें वागावें. ( शास्त्राभावे शिष्टाचारमनुगच्छेत् । ४७० ). २० आपल्या वंशाला शोभेल असें वर्तन ठेवावें. ( कुलानुरूपं वृत्तम् । ३२१ ). २१ चाकरानें नेहमीं मालकाची मर्जी धरून वागावें. ( स्वाम्यनुकूलो भृत्यः । ३३५). २२ जो दुसऱ्याकरितां झटतो तोच सत्पुरुष. ( यः परार्थम् उपसरति [illegible] सत्पुरुषः । २९९ ). २३ गुणाविषयीं मत्सर करूं नये. ( गुणे न मत्सरः कर्तव्यः । ३०५ ). २४ सदाचरण शत्रूला जिंकतें. ( शत्रुं जयति सुवृत्तता । २०१ ). २५ स्वजनांच्या ठिकाणीं दुर्गुण दिसून आल्यास त्याचें निवारण करावें. ( स्वजनस्य दुर्वृत्तं निवारयेत् । १९८). २६ ज्याच्या अंगात पाणी आहे त्याला पोट भरण्याची काळजी वाटत

नाहीं. ( न चेतनवतां वृत्तिभयम्। २६२ ). २७ आपली आज्ञा सर्वांच्या कडून मानली जाणें हेंच ऐश्वर्याचें लक्षण. (आज्ञा फलमैश्वर्यम्। २११). २८ कृतीवरून मनांतलें प्रेम दर्शविलें जातें। ( अनुरागस्तु फलेन सूच्यते। २१० ). २९ थोड्याशा दोषामुळें पुष्कळ गुणांचा त्याग करूं नये. ( नाल्पदोषात् बहुगुणाः त्यज्यन्ते। ) ३०. प्रयत्नाच्या पाठोपाठ दैव येतें. ( पुरुषकारमनुवर्तते दैवम्। ९८ ). ३१ कार्य हातीं घेतल्यावर त्यांत चेंगटपणा करूं नये. ( कार्यान्तरे दीर्घसूत्रता न कर्तव्या। १०२ ). ३२ जें कार्य शेवटास गेलें त्याचीच परिस्फुटता करावी. ( सिद्धस्यैव कार्यस्य प्रकाशनं कर्तव्यम्। १२१ ). ३३ पुष्कळ शिकलेल्या परंतु अंगांत सामर्थ्य नसलेल्या माणसाला कोणी मान देत नाहीत. ( नाल्पसारं श्रुतवन्तमपि न बहुमन्यते लोकः। १४५. ) ३४ विचारपूर्वक कार्य करणाऱ्याजवळ लक्ष्मी चिरकाळ टिकते. ( परीक्ष्यकारिणी श्रीश्चिरं तिष्ठति। ११३ ). ३५ मसलत गुप्त राखली तर कार्यसिद्धि होते. ( मन्त्ररक्षणे कार्यसिद्धिर्भवति। २३ ).

भाषांतरें—मराठी–'कौटिलीय अर्थशास्त्र' ज. स. करंदीकर, संपादक केसरी, पुणें व कै. ब. रा. हिवरगांवकर, भाग २. पूर्वार्ध किं. ३ रु. उत्तरार्ध किं. ४ रु. हिंदी—प्रो. उदयवीरशास्त्रीकृत, प्रकाशक मेहेरचंद.

## आयुर्वेदपरिचय [ वैद्यक ]

**आयुर्वेद व्याख्या**—ज्यामध्यें आपल्या आयुष्याला हितकर व अहितकर या वस्तूंचा बोध केला असून रोगांचें निदान ( कारण ), चिकित्सा उत्तम रीतीनें केली आहे त्याला 'आयुर्वेद' म्हणतात

आयुर्हिताहित व्याधिर्निदान तथा ।
विद्यते यत्र विद्वद्भिः स आयुर्वेद उच्यते ॥
( भावप्रकाश )

**आयुर्वेदाबद्दल आदर**—धर्म, अर्थ, काम, मोक्ष, ह्या चार पुरुषार्थास साधन असलेलें असें दीर्घ आयुष्य ज्याला पाहिजे असेल त्यानें आयुर्वेदाच्या उपदेशाबद्दल आदर बाळगावा.

आयुः कामयमानेन धर्मार्थसुखसाधनम् ।
आयुर्वेदोपदेशेषु विधेयः परमादरः ॥ वाग्भट

**आयुर्वेद उत्पत्ति**—शंकरानें यज्ञांत दक्षाचें मस्तक रागाच्या भरात तोडून टाकलें. नंतर त्याचें तें मस्तक आपल्या आयुर्वेदाच्यामुळें दोन अश्विनी देवानीं चांगलें बसवून दिलें त्यामुळें त्यांना यज्ञात भाग मिळाला.

**संशोधन**— पूर्वी अश्विनीदेव ( कुमार ), आत्रेयऋषि, वगैरेंनीं रानांतल व डोंगरांतून असलेल्या वनस्पतींचा औषधासाठीं उपयोग करून व त्याचें ' अष्टांग आयुर्वेद ' नांवाचें शास्त्र बनवून ठेवलें. रोगानीं पीडल्यामुळें मृत्युमुखीं पडलेल्या लोकांचे प्राण वाचविले. तद्वत झाडें, पशु-पक्षी- ह्यांच्या रोगनिवारण संबंधींचें संशोधन करून वृक्षायुर्वेद, अश्वायुर्वेद, हे तयार केले.

**बौद्धकाल**— रसशास्त्रांत सुधारणा, संशोधन, करणारा नागार्जुन नांवाचा बौद्धधर्मी होऊन गेला, यानें पारद व लोह यांचे अनेक उपयोग केले नालंदा विद्यापीठांतील तज्ञ वैद्यांच्याकडून सूक्ष्मपणें औषधांच्या गुणधर्मासंबंधी संशोधन संस्करण होऊन नंतर औषधें वापरण्यांत येत असत.

अष्टांग— १ शल्यतंत्र ( शस्त्रसाध्यरोगनिवारण, Surgery). २ शालाक्यतंत्र (कंठरोगचिकित्सा, Disease of the eye, ear, nose and throat ). ३ कायाचिकित्सा ( शारीरिकचिकित्सा, Practice of Medicine ). भूतविद्या ( भूतग्रस्तरोगचिकित्सा, Treatment of mental diseases ). कौमारभृत्य( Midwifery and Diseases of children). ६ अगदतंत्र (Toxicalogy.) ७ रसायन ८ वाजीकरण.

आयुर्वेद शिक्षणसंस्था—हिंदुस्थानांत मद्रास, पाटणा, बिहार, ओरिसा, सिलोन, या ठिकाणी प्रांतीय सरकारनें चालविलेलीं अशीं सद्या आयुर्वेद विद्यालयें आहेत. तद्वत् बनारस, लाहोर, हरद्वार या ठिकाणी प्रांतीय सरकारची ग्रॅन्ट व मान्यता असलेलीं आयुर्वेद विद्यालयें आहेत. कलकत्ता, मद्रास, येथे कार्पोरेशनची ग्रॅन्ट असलेलीं आयुर्वेद विद्यालयें आहेत. सरकारी मान्यता असलेलीं-१, ३. ४, १४, १५, १६. लोकाश्रयावर चाललेलीं आयुर्वेद विद्यालयें १ आयुर्वेद महाविद्यालय पुणें. २ अष्टांगआयुर्वेद महाविद्यालय. ३ आर्यांग्ल वैद्यक विद्यालय, सातारा. ४ आयुर्वेद विद्यालय, अहमदनगर. ५ आर्य वैद्यक शिक्षक संस्था, नाशिक. ६ प्रभुराम आयुर्वेदिक कॉलेज ऊर्फ पोपट युनिव्हर्सिटी ऑफ आयुर्वेद, मुंबई. ७ गंगाराम हविलदास आयुर्वेद विद्यालय, पनवेल. ८ महाराष्ट्र आयुर्वेद विद्यालय, मुंबई. ९ विदर्भ आयुर्वेद विद्यालय, अमरावती. १० भारत आयुर्वेद विद्यालय, अमरावती. ११ वैद्यक महाविद्यालय, नागपूर. १२ पुराणिक आयुर्वेद विद्यालय, नागपूर. १३ आयुर्वेद विद्यालय, राजापूर ( जि. रत्नागिरी ). १४ पोतदार आयुर्वेदिक कॉलेज, मुंबई, मुंबई सरकारनें

सन १९४२ मध्यें सुरू केलें. माध्यम हिंदी. १५ कर्नाटक आयुर्विद्यापीठ, बेळगांव. १६ युनानी तिब्बिया कॉलेज मुंबई. शिवाय कराची, काशी, भावनगर, मथुरा, ग्वाल्हेर, रावळपिंडी, वगैरे ठिकाणीं विद्यालयें आहेत. संस्थानिकांनीं चालविलेलीं आयुर्वेद विद्यालयें—म्हैसूर, त्रावणकोर, विकानेर, बडोदा, जयपूर, इंदोर, भावनगर, हैदराबाद ( दक्षिण ).

रसशाळा— सूतशेखर मात्रा ( पित्ताचीमात्रा ) चूर्ण, काढे, भस्म, वगैरे बनविण्याचें देशी औषधाचे कारखाने— १ आयुर्वेदरसशाळा, कर्वेरोड पुणें, २ आयुर्वेदाश्रम फार्मसी, अहमदनगर. ३ झंडूफार्मास्युटिकलवर्क्स, मुंबई. ४ आद्य आयुर्वेदिक फॉर्मसी, मद्रास. ५ आयुर्वेद फार्मास्युटिकल, लाहोर. ६ प्रताप आयुर्वेद फार्मसी, अजमेर. ७ सी. के. सेन आयुर्वेद फार्मसी, कलकत्ता. ८ धूतपापेश्वर आयुर्वेदकारखाना पनवेल.

विशेषसंस्था—' निखिलभारतवर्षीय आयुर्वेद महामंडळ ' या नांवाची संस्था हिंदुस्थानांत आयुर्वेदाच्या उन्नतीकरितां मोठ्या प्रमाणात झटत आहे. पोटशाखा—१ निखिलभारत आयुर्वेद विद्यापीठ. २ निखिलभारतवर्षीय वैद्यसंमेलन. ३ आयुर्वेदनिधि. आयुर्वेदपरीक्षा घेणाऱ्या संस्था— १ निखिलभारत आयुर्वेद विद्यापीठ पदव्या— (१)आयुर्वेदाचार्य (एम्. बी. बी. एस्. सारखी ). ( २ ) आयुर्वेदविशारद ( एल. सी. पी. एस्. सारखी ). ३ भिषक् ( मध्यम प्रतीची ). टिळक-महाराष्ट्र पीठ, पुणें पदवी— १ आयुर्वेदविशारद ( एम्. बी. बी. एस्. सारखी ) २ आयुर्वेदपारंगत ( एम्. डी. सारखी ). वेदशास्त्रोत्तेजक सभा, पुणें. पदव्या—१ वैद्यकोविद. २ वैद्यचूडामणि. श्रावणमास दक्षिणा परीक्षा बडोदा. पदवी—वैद्यरत्न. प्राचीनआयुर्वेद संशोधक—अश्विनीकुमार. आत्रेय, वगैरे.

## चित्रकला परिचय

भारतीय चित्रकलेचे हिंदु, बौद्ध, मोंगल, असे तीन मुख्य भेद आहेत. हिंदुचित्रकला–वेद, उपनिषद्, रामायण, महाभारत, भागवत, काव्य, नाटक यांतून असलेल्या चित्रांच्या उल्लेखावरून व नंतर रजपूतराजांच्या प्रोत्साहनानें. राजवाडे, देवळें, वगैरे ठिकाणीं असलेल्या देवादिकांच्या चित्रांवरून चित्रकला चांगल्या अवस्थेला पोंचली होती असें दिसतें. बौद्धचित्रकला– अजंठा, बाग ( ग्वालेर संस्थान ), सिगिरिया ( सीलोन ), ह्या ठिकाणची चित्रकला यथार्थ असून हृदयाला भिडणारी अशी आहे.

**चित्रकलेविषयीं प्राचीन पुरावे**—भागवत स्कंध १०, उत्तरार्ध ६२. हरिवंशांतील बाणासुर कथा पहा. **मैत्र्युपनिषद्**—४-६–चित्रें काढलेल्या भिंतीप्रमाणें हें सर्व मिथ्या आहे, मनोरम आहे ( चित्रभित्तिरिव मिथ्या मनोरमम् । ) रामायण, महाभारत. **नाटकें**—उत्तररामचरितांतील पहिल्या अंकांतील चित्रपट. स्वप्नवासवदत्तनाटक—यामध्यें वत्सराजाच्या सासऱ्यानें वत्सराजाकडे कंचुकी आणि धात्री यांच्याबरोबर वत्सराजा व वासवदत्ता यांचा एकत्र काढलेला चित्रांचा फलक पाठविला तें चित्र हुबेहूब असल्याचा उल्लेख पद्मावति व राजा यांच्या भाषणांत आहे. शाकुंतल–अंक ६ प्रवेश २ पहा.

**काव्य**—रघुवंश—सर्ग १६ श्लोक १६ चित्रद्विपाः । पहा

**चित्राची व्याख्या**–अखिलसृष्टींतील स्थावर ( न हलणारें स्थिर ) व जंगम ( हलणारा, सजीव ) या वस्तूंचें त्यांच्या प्रमाणानें त्यांची बरोबर कल्पना येईल अशा कृतीस 'चित्र' असें म्हणतात.

जंगमा स्थावरा वापि ये सन्ति भुवनत्रये ।
तेषां स्वभावस्तद्वत्करण चित्रमुच्यते ॥ १ ॥

शिल्परत्न १ भाग. देवांचा चित्रकार—विश्वकर्मा.

* चित्रकलेसंबंधी माहिती देणारे ग्रंथ—संस्कृत– १ अभिलाषार्थ चिंतामणि, आलेख्य प्रकरण.२ चित्रलक्षण ३ वास्तुशास्त्र ४ कामसूत्र ५ विष्णुधर्मोत्तरपुराण ६ शुक्रनीति ७ शिल्परत्न ८ मायाशास्त्र.

मराठी—१ भारतीय चित्रकला–ले. बा. मा. दाभाडे, किं. २ रु. २ चित्रकला–ले. श. न. जोशी. ३ अजंठा श्रीमंत भवानराव श्री निनासराव बाळासाहेब पंत प्रतिनिधी बी. ए. किं. १० रु. ४ राजा रविवर्मा चरित्र—श. द. देवधर किं. १ रु.

---

## चित्रकला

**चित्रांचे प्रकार**—१ चित्राचे चित्र २ अर्ध–चित्र. ३ चित्राभास. असे तीन प्रकार आहेत. हुबेहुब वस्तुसारखी केलेली जी आकृति तिला 'चित्र' असे म्हणतात. भितीला टेकून चित्र केलें म्हणजे त्यास 'अर्ध-चित्र' असें म्हणतात. डोळ्यांना चित्रासारखे दिसतें परंतु हाताना तसें लागत नाही त्याला 'चित्राभास' असे म्हणतात, याचे ( १ ) धूलि-चित्र—पाण्याच्या सपाटीवर पानें, फुलें, यांच्यामुळें अथवा सपाट जमिनीवर निरनिराळ्या रंगाच्या रांगोळ्यांनी जें काढतात त्याला 'धूलिचित्र' असें म्हणतात. ( २ ) आरशामध्यें किंवा तशाप्रकारच्या गुळगुळीत भागावर केवळ प्रतिबिंबरूप किंवा काचांवर पडदा वगैरे वर पाडलेलें जें चित्र त्याला 'विलेख्यचित्र' असें म्हणतात. भिंत अथवा पडदा

यावर पातळ रंग लावून मनांतील हावभाव दाखविणारें असें जें चित्र काढतात त्याला 'रसचित्र' असें म्हणतात—

धूलिचित्रं पुष्पचित्रं रसचित्रमिति त्रिधा ।
रसालिप्तं चिरस्थायी सर्वेपामतिरिच्यते ॥

चित्राभासाचे (१) ऋजु—ज्यांत फक्त पुढची बाजू दिसते तें (२) अर्धर्जु ( आयसोमेट्रिक )—ज्यांत दोन बाजू सारख्या दिसतात तें. ( ३ ) साचिक—( परस्पेक्टिव्ह ) ज्यांत अनेक बाजू प्रत्यक्षाप्रमाणें दिसतात तें ( ४ ) अर्धाक्षि—ज्यांत एक बाजू दिसतें तें ( ५ ) भित्तीक—ज्यांत फक्त मागची बाजू दिसते तें.

**चित्रासाठीं रंग**—पांढरा, तांबडा, पिवळा, निळा, काळा हे रंग घेऊन त्यांच्या मिश्रणानें निरनिराळे रंग तयार करून चित्रांत वापरणें.

**घरांत कोणती चित्रें काढूं नयेत**—लढाई, मरण, दुःख, नागवीं माणसें, घोरतपश्चर्या, अशी चित्रें घरांत काढूं नयेत.

**चित्राचा उपयोग**—प्रत्येक मोठ्या घरावर त्या घराच्या मालकानें जाति, धंदा, यांचें सूचक ठरलेलें चित्र निशाणावर काढून तें निशाण घरावर लावणें. उत्तम चित्रकार-रविवर्मा,जात-क्षत्रिय-मल्याळी जन्म, १८४८ एप्रिल २९ -मृत्यु १९०६ आक्टोबर २.

---

## पाकशास्त्र परिचय

**अन्नाचें महत्त्व**—प्राण्यांचा अन्न हा प्राण आहे. प्राणिनां प्राणमन्नं प्रथममुच्यते । नेहमी स्वच्छ व चांगलें अन्न खावयाला मिळावें म्हणून प्रत्येक मनुष्य रात्रंदिवस झटत असतो. उत्तम, चवदार, व पौष्टिक असें

अन्न मिळाल्यानें जेवणाराचें समाधान होतें, व समाधानानें आरोग्याची वाढ होते. निरनिराळे पदार्थ आलटून पालटून केले असतां पालट होतो व चवीच्या विविधपणांत आरोग्याचें मर्म आहे. मुंज-लग्न-वारसें, वगैरे समारंभांच्या वेळीं चवदार, पथ्यकर, आरोग्यवर्धक, व निरनिराळ्या प्रकारचें अन्न तयार करण्यांत गृहिणींचें स्वयंपाकाचें कौशल्य नेहमीं कसास लागतें. इतिहास—दमयंतीच्या स्वयंवराच्या वेळीं जमलेल्या इंद्रादि चार देवांनी नलराजाला चार वर दिले. त्यांत पाकशास्त्र सूर्य-पुत्रानें नलराजाला शिकविलें.

> शृणु राजेन्द्र विद्यायाः निदानं मम तत्त्वतः ।
> स्वयंवरार्थं वैदर्भ्याः समायाताः सुरेश्वराः ।
> ततोऽन्नरससिद्धिश्च सूर्यपुत्रादलौकिकीम् ॥

महाभारत वनपर्व ५८ अ०

**पाकशास्त्राचे ग्रंथ—** १ पाकदर्पण-महाराज नलविरचित किं.- १ रु. ८ आ. संशोधक-वामाचरण भट्टाचार्य, न्यायाचार्य प्रकाशक-काशी संस्कृत सीरीज. २ अभिलषितार्थ चिंतामणि— अन्न-भोग प्रकरण, अध्याय १३. ३ रसव्यंजनप्रकाश. ४ व्यंजनपाकप्रदीप. मराठी— गृहिणी शिक्षण ( सत्याहस्र पाकसिद्धि ) कै. सावित्री-बाई जोशी, किं. २ रु. ८ आ. प्रकाशक-तुकाराम पुंडलीक शेटये, बुकसेलर पब्लिशर, माधवबाग मुंबई.

**विषय—** वरील संस्कृत ग्रंथांत रोजच्या जेवणांतील भात, आमटी, भाज्या, चटण्या, कोशिंबिरी, सपतीं, लोणचीं, उसळी, पक्वान्नें, वगैरे पदार्थ देशकालदृष्ट्या, ऋतुमान, परिस्थिति, प्रकृतियान यांस मानवतील

असे अन्नादिकांचे फेरफार व मासाचे सर्व प्रकार तयार करण्याची रीत सांगितली आहे.

**आचारी—** आचाऱ्याचें थोडक्यात असें लक्षण आहे कीं, आपल्या देशांतील बुद्धिमान्, चांगल्या लक्षणाचा, सदाचरणी, शांत, निग्रही, उदार, योग्य, एकपत्नीव्रती, पवित्र, परस्त्रीकडे वाईट दृष्टीनें न पाहणारा, परिमित बोलणारा, कृपाळू, चांगली भाषा बोलणारा, देश-काल-परिस्थिति-जाणणारा असा आचारी असावा

> सूदस्य लक्षणं तावद् वक्ष्ये संक्षेपतः प्रभो ।
> स्वदेशसंभवं प्राज्ञं सर्वलक्षणलक्षितं ॥
> सदाचारसमायुक्तो विशिष्टकुलसंभवः ।
> शान्तो दान्तो दानशीलो राजपूज्यः शुचिस्मितः ॥
> स्वदारनिरतः शुद्धः परदारविवर्जितः ।
> मितभाषी सदा दाता दयालुश्च सुभाषितः ॥
> धातुज्ञो देशकालज्ञो वयोऽवस्थादिवित् बुधः ॥

**भात—** जुनें तांदूळ किंचित् ऊन असलेल्या पाण्यानें चांगले धुवावेत नंतर शिजवावयाच्या भांड्यांत तांदुळाच्या तिप्पट शुद्ध पाणी घालून तें चुलीवर ठेवावें व त्या पाण्याला चांगली उकळी आली म्हणजे धुतलेले ते तांदूळ त्यात टाकोन व वारंवार पळानें चोहों फडून हालवावें

> अखण्डवण्डुलान् क्षुण्णान् पुराणव्रीहिसम्भवान् ।
> क्षालयेत्तान् बुधः सम्यगीषदुष्णेनवारिणा ।
> क्षाद्धोदकं पुनः स्थाल्या पूरयेत्त्रिभागिकम् ।
> चुल्यामारोपयेत्स्थाली पूरितां पाककोविदः ।
> शीतबुद्बुदसयुक्ते पक्के पयसि तान् क्षिपेत् ।

तण्डुलानां यथा मध्ये ईपत्कठिनता भवेत् ।
दर्वीपुटेन तान् सम्यगवलोक्य पुनः पुनः ।

**वरण** — हुलगे (कुळीथ), उडीद, पावटा, वाल, तूर, ही सुपांत घेऊन त्याच्या वरील फोलपट, (कोंडा) वगैरे काढून चांगले पाखडावें. त्या धान्याइतकें पाणी घालून भांड्यांत शिजवावें. चांगले शिजल्यावर योग्य प्रमाणांत त्यांत सैंधव टाकावें.

कुलित्थमापनिष्पाव तुवरीचणकादयः ।
शूर्पेण शोधयेत् सम्यक् मुद्गादीन् वितुषीकृतान् ।
पचेत् प्रवण्यां पाकज्ञः समभागोदकैश्च तान् ।
पक्के सूपे समालोक्य यथार्ह सैन्धवं क्षिपेत् ।

---

## सुभाषितग्रंथपरिचय

**उपयोग**— सुभाषित म्हणजे सुवचन, सु-उक्ति. संस्कृतवाङ्मयांत सुभाषितांचा एक मोठा संग्रहच आहे. व्याख्यान, प्रवचन, अध्यापन, इत्यादिवेळीं ऐकणाऱ्या लोकांवर ( श्रोतृसमूहावर ) छाप पाडण्यास सुभाषितांचा अत्यंत मोठा उपयोग होतो. तद्वत् दुःखी-कष्टी अशा लोकांना करमणूक म्हणून, अडाणी लोकांना उपदेश म्हणून व ज्ञानी लोकांना विनोद म्हणून सुभाषितांचा उपयोग होतो.

**विशेष**— काव्य, नाटकें, चंपू, कादंबरी, प्राचीन शास्त्रें, वगैरेंतील मार्मिक विनोदी वचनें, व्यवहारोपयोगी उदाहरणें, अन्योक्ति, स्वभावोक्ति, वगैरेंमुळें होणारें मनोरंजन व ज्ञान, जुने संस्कार, जुन्या गोष्टी, नीति, उपदेश, सदाचरण, इत्यादि ज्ञानभांडार सुभाषितांतून ओतप्रोत भरलेलें आहे.

| ग्रंथ | कर्ता | किंमत |
|---|---|---|
| सुभाषित रत्नभाण्डागार | पां. का. परब | ४ ० ० |
| सुभाषित पुष्पोद्यान | कै. मिरजकरशास्त्री | |
| सुभाषितरत्नमाला १ भाग | के. ग. चिपळूणकर | ० १२ ० |
| सुभाषितरत्नमाला २ भाग | " " | १ ११ ० |

---

## संस्कृत भाषेंतील चरित्रें

| नांव | कर्ता | किंमत |
|---|---|---|
| महाराणाप्रतापसिंह | पं. श्रीपादशास्त्री हसूरकर | १ ८ ० |
| छत्रपति शिवाजीमहाराज | " " | १ १२ ० |
| पृथ्वीराज चव्हाण | " " | १ ८ ० |
| वल्लभाचार्य | " " | २ ० ० |
| रामदास | " " | १ ८ ० |
| शीखगुरुचरित | | १ १२ ० |
| [ वर्धमान, बुद्ध, शंकराचार्य ] | | |
| पतंजलिचरित | रामभद्र दीक्षित | ० १० ० |
| व्हिक्टोरियाचरित संग्रह | केरलवर्मा | |
| व्हिक्टोरिया चक्रवर्तिनी– गुणमणिमाला | गणपति कवि | |
| भारतपारिजातम्–स्वामी श्री भागवताचार्य बडोदे. ( पद्यमय ) | | ३ ८ ० |

शङ्करजीवनाख्यम्- पंडिता सौ. क्षमाबाई राव, २-०-०
(पद्यमय)

महात्मा गांधीचरित

विशेष- वरील गद्यमय व पद्यमय चरित्रें जरी आधुनिकानीं लिहिलेली असली तरी भाषा वगैरेंच्या दृष्टीनें तीं प्राचीन कवींच्या योग्यतेची आहेत.

---

## शिलालेखपरिचय

**उपयोग**—जुनीं नाणीं, ताम्रपट, शिलालेख, स्तंभावरील लेख, यांच्या आधारानें ग्रंथाचा, कवींचा, भाषेचा किंवा एखाद्या गोष्टीचा कालानुक्रम ठरविण्याच्या बाबतीत पंडित लोक परिश्रम करून नवीन शोध लावतात. हिंदुस्थानामधील प्राचीन वस्तूंच्या संशोधनासाठीं 'कार्पस इन्स्क्रिपशिओनम् इंडिकॅरम्'—'एपिग्राफिआ इंडिका' वगैरे Indian Archaeological Policy 1915 या पुस्तकांत (नियतकालिकांत) वरील गोष्टी प्रसिद्ध झाल्या आहेत. गेल्या चाळीस वर्षांतच कोरलेले शिलालेख नाणीं, ताम्रपट, वगैरे वाचण्याचा नवीन उपयुक्त, स्तुत्य, असा उपक्रम सुरू झाला आहे.

**शिलालेख**— संस्कृतवाङ्मयाशीं शिलालेखांचा फार महत्वाचा संबंध आहे. ख्रिस्तपूर्व ३ ऱ्या शतकांतील शिलालेख सर्वांत जुने असून ते सम्राट अशोकाचे आहेत. हा राजा बुद्धधर्मानुयायी होता. त्यानें इ. स. पूर्व २५९ ते २२२ पर्यंत उत्तर हिंदुस्थानांत राज्य केलें. काठेवाडांतील गिरनार पासून ते ओरिसांतील धौलीपर्यंत

व काबूल नदीच्या उत्तरेकडील कपुरदिगिरीपासून तो खालसीपर्यंत याप्रमाणें सर्व हिंदुस्थानभर हे शिलालेख पसरले आहेत. मुंबईच्या निर्णय सागर प्रेसनें काव्यमालेंत प्राचीन लेखमाला, भाग १ ते ■ सन १८९७ ते १९०३ संपादक—महामहोपाध्याय पंडित शिवदत्त व काशिनाथ पांडुरंग परब, यांनीं प्रसिद्ध केलें आहे त्यांत संस्कृतांतील ताम्रपत्र, दानपत्र, शासनपत्र, शिलालेख छापलेले आहेत.

* A collection of ancient historical Records. पहा.

लेखन— ताडपत्रें, भूर्जपत्रें [ हिमालयामध्यें भूर्जवृक्षांचीं मोठीं वनें आहेत ], कागद, यांवर लिहिलेलीं सर्व संस्कृत हस्तलिखितें शाईनें बोरूच्या लेखणीनें लिहिलेलीं आहेत. प्रत्येक हस्तलिखित संस्कृत ग्रंथ [ पोथ्या ] दोन लांकडी फळ्यांत ठेवून रुमालांत बांधून ठेवीत असत. अशा जुन्या पोथ्या हल्लीं प्राचीन पुस्तकसंग्रह मंदिरें, मठ, विद्यापीठें, राजमंदिरें, खाजगी घरें यांतून ठेवलेलीं आढळतात.

भारतीयांची इतिहासलेखनाबद्दल बरीच अनास्था दिसते. परंतु गेल्या ८० वर्षांत फ्लीट, किल्हॉर्न, बर्जेस, बुल्हर, थॉमस कॅम्बेल, वगैरे युरोपीयन पंडितांनीं, व के. डॉ. सर भांडारकर, डॉ. भाऊदाजी, पं. भगवानलाल इंद्रजित, शंकर पांडुरंग पंडित, काशिनाथ त्रिंबक तेलंग, डॉ. गुणे, इतिहासाचार्य वि. का. राजवाडे, चिंतामणराव वैद्य, का. बा. पाठक, डॉ. केतकर, प्रो. द. वा. पोतदार, डॉ. भांडारकर; डॉ. सुखटणकर, महामहोपाध्याय पां. वा. काणे वगैरे वगैरे एतद्देशीय पंडितांनीं प्राचीन शिलालेख, ताम्रपट, जुनीं नाणीं, हस्तलिखित

ग्रंथ यांचें संशोधन करून भरतखंडाचा इतिहास उजेडांत आणण्याचें श्रेय घेतलें. तद्वत् पुण्यांतील भारत इतिहास संशोधक मंडळ, भांडारकर ओरिएंटल रिसर्च इन्स्टिट्यूट या संस्था व बंगाल, मद्रास, संयुक्तप्रांत वगैरे प्रांतांतील पुराणवस्तुसंशोधकसंस्था व संशोधक, भरतखंडाचा प्राचीन इतिहास प्रसिद्ध करण्याचें काम सारखें करीत आहेत.

---

## संस्कृत ताम्रपट व शिलालेख

श्री. केशव आप्पा पाध्ये, ॲडव्होकेट बी. ए. एल्. एल्. बी., न्यू-भटवाडी, गिरगांव मुंबई नं. ४ यांच्या 'हेमाद्रि ऊर्फ हेमाडपंत' ग्रंथाच्या आधारें.

### ताम्रपट

| इ. स. | ठिकाण | विषय |
|---|---|---|
| १००० | संगमनेर | सिन्नर येथें राज्य करणाऱ्या भिल्लमाचे वेळचा. सेऊण देशाच्या यादव घराण्याची वंशावळ. |
| १०१५–२६ | कल्स बुद्रुक | महासामंतानें मणव्द यांस कल्स बुद्रुक गांव दान दिल्याबद्दल. |
| १०६९ | वसई [ठाणें जि.] | सेउण देशाच्या यादव राजांची त्रोटक माहिती. |
| १२७१ | पैठण | रामचंद्र जाधवाचे वेळचा. यादवांची वंशावळ व पराक्रम. |

शिलालेख

| | | |
|---|---|---|
| ११४२ | अंजनेरी [नाशिक जि.] | तिसरा सेउणचंद्र ह्यानें अंजनेरीच्या चंद्रप्रभा [८ तीर्थंकर] मंदिराच्या व्यवस्थेसाठीं तीन दुकानें दान दिलीं. |
| १२०६-७ | पाटण[खानदेश] | ज्योतिषग्रथाच्या अभ्यासासाठीं भास्कराचार्यांचा नातू चांगदेव ज्योतिषी यानें विद्यालय बांधिलें. भास्कराचार्यांची वंशावळ ह्यात आहे. |
| १२४० | आंबे | सिंघण देवानें गुजरायेवर दुसरी मोहीम राम याचे देखरेखेखालीं नेल्याची हकीकत. |
| १२७३-७७ | पंढरपूर | विठ्ठल मंदिराच्या जीर्णोद्धाराला मदत करणाऱ्यांची यादी. |

## संस्कृत-अध्ययन-पद्धति

**प्राचीनपद्धति**—या पद्धतीचे कालक्रमाप्रमाणें पांच भेद आहेत. १ वेदकालीन संस्कृताध्ययनपद्धति. २ स्मृति-पुराण-कालीन संस्कृताध्ययनपद्धति ३ पाणिनि-उपज्ञ-कालीन संस्कृताध्ययनपद्धति. ४ नागेशभट्टकालीन संस्कृताध्ययनपद्धति. ५ वर्तमान कालीन संस्कृताध्ययनपद्धति. **विद्यारंभ**—यापानें आपापल्या वेदोक्तसूत्रपद्धती प्रमाणें मुलाचें आठव्यावर्षी उपनयन (मुंजविधि) करून त्याला गुरूच्या घरीं पाठविणें, उपनयन म्हणजे गुरुगृहीं अध्ययनार्थ पाठविणें.

गुरु हे वनांतील आश्रमांत रहात असत. गुरु शिष्याला चार वेद, वेदांगे उपनिषदें, शास्त्रे, शिल्पादिकला, वगैरे शिकवीत ( उत्तरायणांत वेदाचे सार्थ अध्ययन करावयाचें व दक्षिणायनांत वेदांगें, उपनिषदें यांचें अध्ययन करावयाचें ). ह्या काळांतील प्रसिद्ध गुरु-शिष्य-**सांदीपनी** व **कृष्ण सुदामा** हे होत. गुरु बहुतेक ब्राह्मण जातीचे होते. क्वचित क्षत्रियही होते. वेदांतविद्या वरीचशी क्षत्रियांच्याकडून ब्राह्मणांकडे आलेल्याचा उपनिषदांत उल्लेख आहे. नागेशभट्टकालीन संस्कृताध्ययन पद्धति--या काळी व्याकरण, न्याय पूर्वमीमांसा यांचे अध्ययन करावेच लागत असे. आकरग्रंथ ( सूत्रग्रंथ--भाष्यग्रंथ ), ह्या अध्ययनाची पद्धति होती. याकाळीं वरीलप्रमाणें अध्ययन केलेल्या पंडितास 'पद-वाक्य-प्रमाण-पारावार पारीण' व्याकरण, न्याय, मीमांसा पारंगत अशी पदवी असे.

**वर्तमानकालीन संस्कृताध्ययनपद्धति**-- संस्कृत पाठशाळेंत विद्यार्थ्यानें दररोज सकाळींच-उठून, शौचमुखमार्जन, स्नानसंध्याविधि उरकून अध्ययन करण्याच्या आरंभी व शेवटी गुरूला वंदन करण्याची पद्धत आहे. नेहमी संस्कृत शब्दसंग्रह स्मरणांत असावा म्हणून लहानपणी **अमरकोश** तोंडपाठ करून घेतात. नंतर शब्दरूपावलि, धातुरूपावलि, समासचक्र, ही तोंडपाठ झाल्यावर रघुवंश, कुमारसंभव, किरातार्जुनीय, माघ, नैषध, या काव्यांपैकीं कांहीं सर्ग शिकवितात. नंतर विद्यार्थ्याच्या इच्छेप्रमाणें त्याला साहित्य, अलंकार, व्याकरण, न्याय, वेदांत, मीमांसा, यांचे प्रकरणग्रंथ, वादग्रंथ, शिकवितात. हल्ली आकरग्रंथांचे अध्ययन व्हावें तसें होत नाही. एकाच शास्त्राचें अध्ययन करण्याची एकांगी पद्धत नागोजी भट्टानंतरच्च दिसते.

## शास्त्रग्रंथप्रकार कोष्टक.

| शास्त्र | आकरग्रंथ ( सूत्र व भाष्य ) | प्रकरण ग्रंथ | वादग्रंथ |
|---|---|---|---|
| व्याकरण | अष्टाध्यायी. पातंजलमहाभाष्य वार्तिकसह, | काशिका. सिद्धांत कौमुदी. | मनोरमा, शब्दरत्न, परिभाषेंदुशेखर, वैय्याकरणभूषण, मंजूषा, कौस्तुभ, उद्योत. |
| न्याय १ प्राचीन २ नव्य | १ गौतमसूत्रे, वात्स्यायनभाष्य २ कणादसूत्रे, प्रशस्तपादभाष्य उदयनाचार्यांची किरणावलि. | तर्कसंग्रह, तर्कभाषा, सर्वकौमुदी, मुक्तावली. | तत्त्वचिंतामणि, पक्षधरमिश्रांची टीका, दीधितिटीका, माथुरी जागदीशी, गादाधरी. |
| मीमांसा (२ भा, प्रभाकर, मुरारी.) | जैमिनिसूत्रे, शाबरभाष्य, श्लोकवार्तिक, तंत्रवार्तिक, टुप्टीका | अर्थसंग्रह, मीमांसान्यायप्रकाश, जैमिनीय न्यायमाला. | शास्त्रदीपिका, भाट्टदीपिका, तंत्ररत्न, न्यायरत्नाकर. |
| वेदांत उत्तरमीमांसा | उपनिषद्, ब्रह्मसूत्र गीता, शांकरभाष्यादि. | वेदांतसार, वेदांतपरिभाषा उपदेशसाहस्री वगैरे. | अद्वैतसिद्धि, खंडनखंडखाद्य वगैरे. |

वरील शास्त्रांचा वेदांतशास्त्राकडे उपयोग करणें मुख्य ध्येय होतें. तद्वत् सदाचारांच्या ज्ञानासाठीं स्मृत्यादि धर्मशास्त्रांचा फार उपयोग आहे. अलीकडे सुतक-सोयरप्रसंगीं उपयोगी पडणारें तेवढेंच धर्मशास्त्र अध्ययनांत राहिलें आहे. परंतु तेवढ्यावरून समाजांतल्या धार्मिक-सामाजिक प्रश्नांचा उलगडा होत नाहीं. म्हणून यापुढें स्मृतींचें सांगोपांग अध्ययन करणें अत्यंत आवश्यक आहे. तद्वत् वेदार्थाकडे लक्ष देणें अत्यंत आवश्यक आहे. इंग्लिशस्कूल व कॉलेज

**संस्कृत अध्ययनपद्धति—** (१) स्कूल संस्कृताध्ययनपद्धति इंग्रजी हायस्कूलमध्यें चौथ्या इयत्तेपासून मॅट्रिकपर्यंत आठवड्यांतून ४५ मिनिटांच्या ५ किंवा ६ पीरिअडच्या वेळांत नेमलेलें संस्कृतचें पुस्तक (व्याकरण-गद्य-पद्य-मिश्रित) अथवा गद्य-पद्यचें असलेलें पुस्तक इंग्लिश किंवा क्वचित् मातृभाषा यांतून शिकवायचें, ही एक पद्धति. **कॉलेज संस्कृताध्ययनपद्धति**-मॅट्रिक परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर कॉलेजांत प्रीव्हियस ते एम्. ए. पर्यंत युनिव्हर्सिटीनें नेमलेलीं संस्कृत पुस्तकें इंग्लिशभाषेंतून शिकविलीं जातात. शिकवितांना त्या पुस्तकाचा व त्याच्या कर्त्याचा काळ, ठिकाण, महत्त्व, वगैरेकडे विशेष लक्ष दिलें जातें. एम्. ए. परीक्षेला निरनिराळ्या शास्त्रविभागापैकीं एक विभाग विद्यार्थी घेऊन परीक्षेला बसतात.

---

## प्राचीन-संस्कृत विद्यापीठें

तक्षशिला संस्कृतविद्यापीठ (रावळपिंडी जवळ) पाणिनी, उपवर्ष, पतंजलि, कैय्यट, मम्मट, हे येथील विद्यार्थी होते. नालंदा संस्कृत-

विद्यापीठ ( हिंदु व बौद्ध ). विक्रमशिला संस्कृतविद्यापीठ. ( हिंदु व बौद्ध ). मिथिला संस्कृतविद्यापीठ. नवद्वीप ( नडियाद ) संस्कृत-विद्यापीठ ( न्यायशास्त्रासाठी प्रसिद्ध ). उदंतपुरी संस्कृतविद्यापीठ. डॉ. कुर्तकोटी शंकराचार्यांचे संस्कृतविद्यापीठ, नाशिक (हल्ली बंद) वैदिक-स्मार्त-धर्माश्रम, ( हल्ली बंद ), फर्ग्युसन कॉलेज रोड, पुणें. कै. विनायक महाराज साखरे, कै. चतुर्भुज बालमुकुंदजी, कै. राजा नरसिंगगिरजी, यांनीं चालविलेली प्रसिद्ध संस्था. **विद्यमान संस्कृत विद्यापीठें**—सरकारनें चालविलेली—कलकत्ता संस्कृत कॉलेज, कलकत्ता. गव्हर्मेंटसंस्कृतकॉलेज, बनारस. मुंबई इलाख्यांतील सर्व प्रांतांत थोड्याफार प्रमाणांत आहेत. **प्रसिद्ध संस्कृत शिक्षण-संस्था**-संस्कृतकॉलेज, पुणें. आचार्य कुल, पुणें. मीमांसा महाविद्यालय पुणें. श्रीबालमुकुंद संस्कृतविद्यालय, शुक्रवार पुणें. संस्कृत-पाठशाळा, सदाशिवपेठ, पुणें. गोकुळदास तेजपाळ संस्कृत कॉलेज, मुंबई. दामोदर ठाकरसी मूळजी संस्कृतपाठशाळा, त्र्यंबकेश्वर. संस्कृतपाठशाळा पेवळा. म्युनिसिपल संस्कृत स्कूल, पंढरपूर. धारवकर संस्कृतपाठशाळा, पंढरपूर. पूर्ण प्रज्ञमतोत्साहिनी संस्कृतपाठशाळा, पंढरपूर. म्युनिसिपल संस्कृतनाईटस्कूल, सोलापूर. अहमदनगर एज्युकेशन सोसायटी संस्कृतपाठशाळा, अहमदनगर. संस्कृत वेदपाठशाळा, पुणतांबे, (अहमदनगर). प्राज्ञपाठशाळा, वाई. संस्कृत-पाठशाळा-तासगांव (सातारा.) संस्कृतपाठशाळा, सातारा. संस्कृतपाठ-शाळा-सांगली संस्थान. संस्कृतपाठशाळा, रामदुर्ग संस्थान. संस्कृतपाठ-शाळा, इचलकरंजीसंस्थान. श्रीनगर संस्कृतपाठशाळा, अहमदाबाद. राजश्रीदसंस्कृत पाठशाळा, बडोदासंस्थान. सूर्यपुरसंस्कृत पाठशाळा,

सुरत. नरसिंह संस्कृतपाठशाळा, सुरत संस्कृतकॉलेज, इदूरसंस्थान. सरस्वती संस्कृतपाठशाळा, धुळें.

**प्राचीन पद्धतीनें शिकलेले संस्कृतपंडित**—संस्कृतपाठशाळेंत किंवा संस्कृतशास्त्र्याजवळ खाजगी रीतानें अमरकोश, शब्दरूपावलि, धातुरूपावलि, समासचक्र, पंचतंत्र किंवा हितोपदेश, रघुवंश, कुमारसंभव, किरात, माघ, नैषध, ही पंचमहाकाव्यें, शाकुंतल, मृच्छकटिक, उत्तररामचरित, वगैरे प्रसिद्ध नाटकें, सिद्धांतकौमुदी, इतकें अगोदर मराठी किंवा संस्कृत यांतून अध्ययन करून दररोज झालेल्या विषयाची चिंतनिका करून व पुढील विषयाचें पूर्वावलोकन करून तो विषय तयार करणें. नंतर साहित्य, व्याकरण, न्याय, मीमांसा, वेदांत, ह्या पैकीं कोणत्याही (१) एका शास्त्राचें सांगोपांग अध्ययन केलेल्या, व त्याची परीक्षा देऊन उत्तीर्ण झालेल्या व्यक्तीला 'संस्कृत पंडित' अथवा **'शास्त्री'** असें म्हणतात. (२) संस्कृत प्राथमिक अध्ययन करून प्रत्येक शास्त्रातील प्राथमिक ग्रंथाचें सांगोपांग अध्ययन करणाऱ्या व्यक्तीला **'व्युत्पन्न पंडित'** (व्यापकज्ञान असलेला) असें म्हणतात.

---

## माजी दिवंगत संस्कृत–शास्त्री–पंडित

गेल्या २०० वर्षांतील नामांकित असलेले—बालसरस्वती रानडे, काशी. दामोदरशास्त्री व गोविंदशास्त्री भारद्वाज, काशी. गंगाधरशास्त्री तेलंग, तात्याशास्त्री पटवर्धन, शिवकुमारशास्त्री. प. लक्ष्मणशास्त्री द्रविड. महाराष्ट्र—विठ्ठलोपाध्याय, मोडक, गर्गे, घाटे, धुळे, गजेंद्रगडकर, रड्डी, कुमारे, चिपळूणकर, पर्वते, अभ्यंकर. इदूर-लष्कर येथील भट वगैरे.

पं. विष्णुशास्त्री बापट, वामनशास्त्री किंजवडेकर, रामचंद्रशास्त्री किंजवडेकर, नागेशशास्त्री उपेनवेटगिरी, मुकुंदशास्त्री मिरजकर, उपासनीशास्त्री.

· **विद्यमान संस्कृतपंडित**— महामहोपाध्याय वासुदेवशास्त्री अभ्यंकर ' सेवानिवृत्त ' फर्ग्युसनकॉलेज पुणें. महामहोपाध्याय श्रीधरशास्त्री पाठक. ( हल्ली संन्यास घेऊन परमार्थाकडे वळलेले. यांनीं पेन्शन घेतल्यावर धुळे येथें ' सरस्वती संस्कृत पाठशाळा ' स्थापून तेथें विद्यार्थ्यांची जेवण, राहणें, अध्ययन, यांची व्यवस्था मोफत करून उत्कृष्ट शिक्षक वर्ग नेमून प्राचीन शास्त्राध्ययनाची उत्कृष्ट व्यवस्था करून ठेविली ), ' सेवानिवृत्तशास्त्री ' डेकन कॉलेज, पुणें. महामहोपाध्याय सितारामशास्त्री शेंडे, कलकत्ता युनिव्हर्सिटी. पं. गिरिजाशंकर गौरीशंकर त्रिवेदी, व्याकरणाचार्य शास्त्री, सामळदास कॉलेज, भावनगर. पं. रामाचार्य गलगली, साहित्यरत्न बेळगांव. पं. श्रीनिवासाचार्य बुर्ली, साहित्यभूषण, बेळगांव. **पं. नारायणशास्त्री मराठे** ( यांनीं आजन्म ब्रह्मचारी राहण्याचें व्रत पत्करून वाई येथें ' प्राज्ञपाठशाळा ' नांवाची संस्था स्थापून तेथें विद्यार्थ्यांची जेवण, राहणें अध्ययन यांची व्यवस्था करून उत्तम प्रतीचा शिक्षकवर्ग नेमून प्राचीन शास्त्राध्ययनाची तद्वत हायस्कूल पद्धतीच्या इंग्रजी शिक्षणाचीही व्यवस्था करून ठेविली आहे ). विशेष — पं. पाठकशास्त्री व पंडित मराठेशास्त्री यांच्या सारखी संस्था चालविणारीं विद्वद्रत्नें यापुढें दुर्मिळ होत चाललीं आहेत. पं. रंगाचार्य बाळकृष्ण रड्डी 'सेवानिवृत्तशास्त्री' डेकन कॉलेज पुणें. पं. शिवरामशास्त्री शित्रे, 'सेवानिवृत्तशास्त्री' एल्फिस्टन् कॉलेज, मुंबई. पं. श्रीपादशास्त्री हसूरकर, पंचतीर्थ 'सेवानिवृत्तशास्त्री' संस्कृत कॉलेज, इंदूर.

- **पुणें येथील प्रसिद्ध संस्कृत पंडित**— पं. शंकरशास्त्री मारुलकर, पं. गणेशशास्त्री गोडबोले, प. पंढरपुरे, पं. चित्रावशास्त्री. पं. पां. नि. देव हिंगणे. पं. पुरुषोत्तमशास्त्री रानडे, पं. गणेशशास्त्री शेंडये, पं. पाटणकर शास्त्री, पं. द. प्र. खाडिलकर, काव्यतीर्थ. पं. ना. वा. तुंगार, काव्यतीर्थ, पालीतीर्थ. पं. श्रीपाद शास्त्री जोशी, पं. महेश्वरशास्त्री जोशी, व्याकरणचूडामणि. पं. शंकरशास्त्री भिलवडीकर प. गणेशशास्त्री भिलवडीकर, पं. दत्तात्रयशास्त्री तांबे, पं. यतीश्वरशास्त्री. पं. पुंजेश्वरशास्त्री पाठक, काव्यतीर्थ. पं. बाळकृष्णशास्त्री ललित, काव्यतीर्थ. पं. शिवरामशास्त्री धुपकर, काव्यतीर्थ. पं. गोपाळशास्त्री जोशी. **वाई येथील संस्कृत पंडित**—पं. लक्ष्मणशास्त्री जोशी, तर्कतीर्थ. श्री. अच्युतशास्त्री पाध्ये, व्याकरणाचार्य. पं. विठ्ठलशास्त्री जोशी. पं. रंगनाथशास्त्री जोशी, साहित्यशास्त्री. पं. कोनकर, पं. गोडखिंडीकरशास्त्री. इतर ठिकाणचे प्रसिद्ध संस्कृत पंडित— पं. भार्गवशास्त्री जोशी, व्याकरणाचार्य, 'शास्त्री,' विलसन कॉलेज मुंबई. पं. श्रीपादशास्त्री किंजवडेकर, मीमांसातीर्थ, शास्त्री, रामनारायण रुईया कॉलेज, माटुंगा. पं. रघुनाथशास्त्री कार्जेकर, व्याकरणाचार्य. बोरिवली. पं. कोगनेशास्त्री, लोणावळा. प. दिवेकरशास्त्री, मिरज. प्रसिद्ध पं. राजेश्वरशास्त्री द्रविड, न्यायाचार्य, बनारस. पं. फडके, बनारस. महामहोपाध्याय माधवशास्त्री भांडारी, लाहोर. प. वझेशास्त्री. महामहोपाध्याय अनंतकृष्णशास्त्री, कलकत्ता. पं. लक्ष्मणशास्त्री मुरगुडकर, व्याकरणरत्न, इचलकरंजी. पं. काशीकरशास्त्री. पं. नारायणशास्त्री वाडीकर, न्यायरत्न, अहमदाबाद. पं. धारूरकरशास्त्री, पंढरपूर. पं. श्रीधरशास्त्री वारे, नाशिक. पं. हास्यारशास्त्री गर्गे,

पं. लक्ष्मणशास्त्री गर्गे, पंचवटी, नाशिक. पं. बागेवाडीकर, सोलापूर. पं. बाळाचार्य खुपेरकर, कोल्हापूर. पं. नारायणशास्त्री वालावलकर, कोल्हापूर.

**इंग्लिश पद्धतीने शिकलेले दिवंगत संस्कृत पंडित**—कै. डॉ. सर रामकृष्ण गोपाळ भांडारकर. कै. न्यायमूर्ति काशिनाथ त्र्यंबक तेलंग, वामन शिवराम आपटे. महादेव मोरेश्वर कुंटे. ज. वि. ओक. प्रो. धारप. चांदोरकर. प्रो. पानसे. डॉ. गुणे. एल्. आर. वैद्य. लक्ष्मणशास्त्री लेले. लिमये ( राधारमण ). डॉ. गंगानाथ झा, अलाहाबाद. प्रि. ए. बी. ध्रुव, अहमदाबाद.

**विद्यमान आंग्लशिक्षित संस्कृत पंडित**— डॉ. कुर्तकोटि शंकराचार्य, नाशिक. महामहोपाध्याय पां. वा. काणे. एम्. ए. एल्. एल्. एम्. मुंबई. डॉ. बेलवलकर, सेवानिवृत्त संस्कृत प्रोफेसर, डेकन कॉलेज, पुणे. प्रि. व्ही. आर. नेरुरकर, मुंबई. श्री. गो. म. जोशी, पुणे. आहिताग्नि राजवाडे, पुणे. श्री. एन्. एस्. लोकूर, डिस्ट्रिक्ट व सेशन जज, पुणे ( 'बुद्धचरित-संस्कृत' यावर संस्कृत टीका इंग्लिश नोटस्, व भाषांतर सर्ग १ ते ५) श्री. बाळासाहेब खेर, माजी पंत-प्रधान मुंबई. ( मेघदूत व ऋतुसंहार यावर इंग्लिश नोटस्—भाषांतर ) प्रो. वि. पां. बोकील, एम्. ए. एस्. टी. सी. डी. असिस्टंट एज्युकेशनल इन्स्पेक्टर पुणे. यांनी मुंबईच्या बी. टी. कॉलेजांत संस्कृतभाषेचे प्रोफेसर असतांना विद्यार्थ्यांची आरंभापासूनच संस्कृत-भाषा शिकण्याची उत्तरोत्तर इच्छा रहावी या हेतूने संभाषणपद्धतीची अभिनव, आकर्षक, अशी 'अभिनवा पाठावलि' भाग १ ते ३. संस्कृत पुस्तकें लिहून संस्कृत भाषेची मोठी सेवा केली आहे.) श्री.

लाड, आय्. सी. एस्. श्री. एल्. आर. रद्दी, बी. ए. बी. टी., अ. ए. इन्स्पेक्टर , पुणें. श्री. गो. कृ. मोडक, सेवानिवृत्त संस्कृत शिक्षक, न्यू. इं. स्कूल, पुणें. श्री. विनायकराव करंदीकर, सेवानिवृत्त संस्कृत-शिक्षक, न्यूइंग्लिशस्कूल व मॉडर्न हायस्कूल पुणें. श्री. रा. वि. गोखले, सेवानिवृत्त संस्कृतशिक्षक, बी. एस्. हायस्कूल, बेळगांव. श्री. पु. ना. धीरकर, एम्. ए. बी. टी. टी. डी. सातारा.

• मुंबई प्रांतांतील कॉलेजमधील प्रसिद्ध संस्कृत प्रोफेसर—

. फर्ग्युसनकॉलेज पुणें—प्रो. वै. का. राजवाडे ( सेवानिवृत्त ), डॉ. वा. गो. परांजपे, प्रो. सी. आर. देवधर, डॉ. आर. एन्. दांडेकर, प्रो. एन्. व्ही. वैद्य. प्रो. आर्. डी. वाडेकर. सर परशुराम-भाऊ कॉलेज पुणें—प्रि. आपटे ( सेवानिवृत्त ). प्रो. डी. बी. देवधर, प्रि. र. दा. करमरकर, बोर्ड ऑफ स्टडी २ अकॅडे-मिक कौन्सिल. २ सिंडिकेटचे सभासद मुंबई युनिव्हर्सिटी. प्रो. के. ना. वाटवे. प्रो. लद्दू. प्रो. गोरे. वाडिया कॉलेज पुणें. डॉ. पी. एल्. वैद्य. प्रो. एन्. जी. सुरु. डेक्कनकॉलेज रिसर्च इन्स्टि-ट्यूट—डॉ. व्ही. एम्. आपटे. भांडारकर ओरिएण्टल इस्टिट्यूट—पुणें. डॉ. सुखटणकर. श्री. गोडे. लॉ कॉलेज—प्रि. ज. र. घारपुरे. मुंबई कॉलेज- एल्फिस्टन कॉलेज—प्रो. ए. बी. गजेंद्रगडकर. विल्सन कॉलेज **प्रो. एच्. डी. वेलणकर.** प्रो. व्ही. ए. गाडगीळ. इस्माइल कॉलेज, जोगेश्वरी—प्रो. आर. जी. भडकमकर. सेंट झेवियर कॉलेज—प्रो. के. एम्. शेंबवणेकर. रामनारायण रुईया कॉलेज माटुंगा. प्रो. आर्. आर्. देशपांडे. खालसा कॉलेज—प्रो. एम्. पी. दवे. अहमदाबाद कॉलेजें—गुजराथ कॉलेज—प्रो. के. व्ही. अभ्यंकर. बडोदा कॉलेज—प्रो. जी. एच्. भट.

लालभाई द. आर्टस् कॉलेज –प्रो. रा. ब. आठवले. प्रो. बी. जी. दोशी. लिंगराजकॉलेज बेळगांव–प्रि. एस्. सी. नंदीमठ. बी. टी. कॉलेज बेळगांव.–प्रो. एस्. आर. भट. विलिंगडन कॉलेज, सांगली—प्रो. एम्. व्ही पटवर्धन. सामळदास कॉलेज, भावनगर-प्रो. आर. एम्. जोशी. प्रो. आर. जे. जानी. राजाराम कॉलेज, कोल्हापूर–प्रो. एस्. एस्. सुखटणकर. प्रो. एन्. जी. शिंदे. कर्नाटक कॉलेज धारवाड–प्रो. व्ही. जी. भट. प्रो. आर. व्ही. जहागीरदार. डी. जी. सिंध कॉलेज कराची– प्रो. डी. आर. मानकड प्रो. बी. व्ही. व्यास. एच्. पी. टी. कॉलेज, नाशिक—प्रो. जी. व्ही. देवस्थळी. एम्. टी. बी. कॉलेज, सुरत–प्रो. डी. पी. जोशी.

**इतर प्रांत**—महामहोपाध्याय प्रो. मिराशी, नागपूर. डॉ. शं. दा. पेंडसे, नागपूर. प्रो. चतुर्वेदी नागपूर. डॉ. पी. के. आचार्य, अलाहाबाद. प्रो. क्षेत्रेशचंद्र चट्टोपाध्याय, अलाहाबाद. डॉ. बाबूराम, सक्सेना, अलाहाबाद. प्रो. बटुकनाथ शर्मा, बनारस. महामहोपाध्याय विधुशेखर भट्टाचार्य, कलकत्ता. डॉ. एस्. के. चतर्जी. डॉ. क्षितीशचंद्र चतर्जी, कलकत्ता. डॉ. एस्. के. डे, डाक्का. डॉ. हरदत्तशर्मा, दिल्ली. प्रो. पंडित लक्ष्मीधरशास्त्री दिल्ली. प्रो. एस्. सुब्रह्मण्य अय्यर, लखनौ. डॉ. कुन्हनराजा, डॉ. टी. आर. चिंतामणि, मद्रास. प्रो. डी. श्रीनिवासाचारी. डॉ. सी. आर. नरसिंहशास्त्री, म्हैसूर., डॉ. आर्येन्द्र शर्मा दक्षिण हैद्राबाद ( निजामस्टेट ). डॉ. रघुवीर, पंजाब. प्रो. गौरीशंकर, पंजाब.

---

## पाश्चात्य संस्कृत-पंडित

**इंग्लंडमधील विद्यमान संस्कृत प्रोफेसर**— डॉ. आर. एल्. टर्नर, लंडन. डॉ. एफ्. डब्ल्यू. थामस्, ऑक्सफर्ड. डॉ. ए. बी. कीथ, एडिंबरो.

**जर्मनमधील संस्कृत प्रोफेसर**—डॉ. एच्. ल्यूडर्स, बर्लिन. डॉ. बी. ब्रेलोर, बर्लिन. डॉ. जे. हरटेल, लायप्झींग डॉ. हेल्म्यूथ ग्लासेनाप, कोनिग्जबर्ग. डॉ. वाल्टेर वूस्ट, म्यूनिच. डॉ. वाल्टेर शब्रिंग, हॅम्बर्ग. डॉ. आटो श्रेडर, कील. डॉ. रिचर्डश्मिट्, म्युन्स्टर. डॉ. बुरव्हेम किरफ्, हाले.

**पॅरिसमधील संस्कृत प्रोफेसर**—डॉ. ज्यूल्स ब्लाच, डॉ. लुई रेनो, डॉ. मेसाँ ओरसेल. डॉ. ऑलिव्हर लॉकोंब. डॉ. जिन प्रिजलुस्की.

**इटली मधील संस्कृत प्रोफेसर**—डॉ. जी. टुच्ची, रोम. डॉ. फॉर्लो फॉर्मिकी, रोम. डॉ. ए. बालिनी, मिलान. डॉ. एफ्. बी. फिलिपि, पिसा.

**स्वीडनमधील संस्कृत प्रोफेसर**—डॉ. हेलमर स्मिथ, उपसाला. डॉ. के. येनो, उपसाला.

**नॉर्वेमधील संस्कृत प्रोफेसर**—डॉ. स्टेन कौनो, ऑसलो. डॉ. जार्ज मार्गेन स्टिर्नि, गोटेबर्ग.

**डेन्मार्कमधील संस्कृत प्रोफेसर**—डॉ. डेनिस अंडरसन, कोपेनहागन. डॉ. पाऊल टक्सेन, कोपेनहागन.

**पोलंमधील संस्कृत प्रोफेसर**—डॉ. एस्. शायर, वॉरसा. डॉ. स्टिफान स्टासिआक, ल्वाफ.—

**हॉलंडमधील संस्कृत प्रोफेसर**—डॉ. जे पी. एच्. फोगल, लॅयडन्. डॉ. एच् इ. बुइस्कूल. डॉ. एफ्. फॅडेगॉन, एमस्टर्डाम. डॉ. जे. गोंडा. यूट्रच.

**बेल्जममधील संस्कृत प्रोफेसर**— डॉ. लुईडाला व्हॉले पुसा, ब्रुसेल्स् डॉ. ई. ल्यॉमोट, लोव्हेन. डॉ. एड्रिआन शार्पे, बेटेफोम.

**स्विट्झर्लण्डमधील संस्कृत प्रोफेसर**— डॉ. मनु लॉयमन, झुरिच डॉ. आलबर्ट डेब्रुनर, बर्न.

**झेकोस्लाव्हाकिया मधील संस्कृत प्रोफेसर**—डॉ आटो-स्टाईन, प्राग. डॉ. लेसने, प्राग अमेरिकेतील डॉ. वॉलटर ईक्लार्क, डॉ. एजेर्टन न्यूहेव्हन डॉ. लुईस एच् ग्रे कोलंबिया.

---

## संस्कृतज्ञ स्त्रिया

**वेदकालीन स्त्रिया**—वेदकालामध्यें स्त्रियांना समाजात व घरात विशेष मान होता १ 'विश्ववारा' नावाच्या स्त्रीनें रचलेलें सूक्त ५ मडळात आहे. २ 'घोषा' नावाच्या स्त्रीनें रचलेलें सूक्त १० मडळात आहे. तद्वत् लोपामुद्रा, शची, रोमषा, इंद्राणी, वगैरे स्त्रियांची सूक्तें ऋग्वेदात आहेत धिटाई-मुद्गलाबरोबर त्याची पत्नी मुद्गलानी युद्धात त्याचे साहाय्य करण्यासाठी गेली (ऋ १०-१०२)

**उपनिषद् कालीन स्त्रिया**-उपनिषदामध्यें गार्गी, वडवाप्रातिथेयी वाचक्नवी, सुलभा, मैत्रेयी, अरुन्धती, सुवर्चसा, वगैरे विद्वान स्त्रियांचा उल्लेख सापडतो. तद्वत् मडनमिश्राची पत्नी सरस्वती हिनें आद्य शंकराचार्यांच्या बरोबर गहन विषयावर वादविवाद केला तो प्रसिद्ध आहे.

**ब्रह्मयज्ञांत मान्य स्त्रिया विषयीं आदर.** प्रत्येक वेदाधिकारी माणसाला दररोज 'पंचमहायज्ञ' करावे लागतात. वैदिक कालापासून ते महाभारत कालापर्यंत ज्या आपल्या विद्वान् स्त्री पुरुष पूर्वजांनी आपल्याला अलौकिक ज्ञान देऊन ऋणी केले त्याचें नित्य स्मरण व्हावें. म्हणून त्यांच्या नावानें तर्पण करण्याची पद्धत या ब्रह्मयज्ञाच्या रूपानें सुरू झाली. तेथें–

गार्गी वाचक्नवी तृप्यताम्। वडवाप्रातीथेयी तृप्यतु।
सुलभा मैत्रेयी तृप्यताम्।

असा स्त्रियांचा उल्लेख आहे.

**रामायण**— रामायणकालीन स्त्रिया वेदाध्ययन करीत असत व वैदिक आचारांचें पालन करीत असत. राम वनवासाला निघण्यापूर्वी कौसल्येला भेटावयास गेला तेव्हा ती होमहवन करीत बसली होती असें वर्णन आहे.

**कौसल्येची अग्निसेवा**—

सा क्षौमवसना हृष्टा नित्यं व्रतपरायणा।
अग्निं जुहोतिस्म तदा मन्त्रवत् कृतमङ्गला॥

**सीतेचा संध्याविधि**— जेव्हा मारुतीला सीता सापडेना तेव्हा त्यानें 'ह्या नदीचें पाणी शुद्ध आहे, म्हणून सीता येथें संध्याविधी-साठीं येईल' असा विचार करून तो अशोकवनातील एका पाण्या-च्या प्रवाहाच्या जवळ बसला तेथील श्लोक—

सन्ध्याकालमना श्यामा ध्रुवमेष्यति जानकी।
नदीं चेमां शुभजलां सन्ध्यार्थे वरवर्णिनी॥

**बौद्धकालीन स्त्रिया**— सूत्रग्रंथाच्या कालीं यज्ञाच्या अतिरेका-मुळें समाजात अव्यवस्था माजली. वेदाचा अधिकार नसल्यानें शूद्रा-

दिकात अत्यत असमाधान झालें गौतमबुद्धाच्या धर्मक्रांतीची हींच प्रमुख कारणें आहेत. बौद्धधर्माच्या नीतीच्या, समतेच्या उपदेशामुळें त्या काळी पुरुष भिक्षु होण्यांत व स्त्रिया भिक्षुणी होण्यात धन्यता मानू लागले. गौतमी, क्षेमा, उत्पलवर्णा, नदा, सोणा, कुडलकेसा वगैरे प्रसिद्ध स्त्रिया होत.

---

## आधुनिक प्रसिद्ध संस्कृतज्ञ स्त्रिया

**सौ. पण्डिता क्षमादेवी राव.** 'साहित्यचन्द्रिका, (कै. श. पा. पण्डित, ह्याच्या सुनिद्यकन्या व प्रसिद्ध डॉ राघवेंद्रराव, एम्. डी (लण्डन), डी एस् सी. (लण्डन) ह्याच्या पत्नी शिक्षण— राजकोट येथें घरीं प्राथमिक मराठीचा अभ्यास केला. वयाच्या ८ व्या वर्षी काहीं महिने इजूरपागेंत शिक्षण झालें. वयाच्या १२ व्या वर्षापासून सस्कृत भाषेचा अभ्यास सुरू केला, तेव्हापासून सस्कृत-भाषेची आवड उत्पन्न झाली. इग्लिश— शिक्षण घरीं, शिक्षकाकडे इग्लिश वगैरे विषयाचा अभ्यास करून १५ व्या वर्षी मॅट्रिक परीक्षा पास होऊन मुलींच्यामध्यें पहिला नबर आला. दक्षीसस्कृत-स्कॉलरशिप मिळाली.

**कॉलेजशिक्षण**—एलफिस्टन कॉलेज, मुबई, येथें दोन वर्षे शिक्षण. **संसार**—वयाच्या १८ व्या वर्षी लग्न झालें. लग्नानतर अत्यत उद्योगी पतींच्या सहवासात उद्योगी सवयी लागल्या. इग्लिशचा पुष्कळ अभ्यास केल्यानें लिहिण्याची आवड उत्पन्न झाली.

अध्यक्ष—बेळगांव येथील प्रथम संस्कृत साहित्य संमेलनाच्या अध्यक्षा.

ग्रंथ— सत्याग्रहगीता, कथापञ्चकम्, विचित्रपरिषद्यात्रा, शंकर-जीवनाख्यान, मीरालहरी.

देशपर्यटन— काश्मीरमध्ये बऱ्याच ठिकाणीं संस्कृतमध्यें भाषणें केलीं. पॅरिसमध्यें ५ वर्षे मुक्काम केला. युरोपमधील बहुतेक संस्कृतज्ञ लोकांचा परिचय झाला. पदवी—अयोध्या संस्कृतमंडळानें सन १९३८ मध्यें "पण्डिता ' व ' शंकर जीवनाख्यान ' हें पुस्तक लिहिल्यानंतर ' साहित्यचंद्रिका ' अशी पदवी दिली. संस्कृत शिक्षणाकरितां प्रयत्न—सन १९४१ मध्यें बेळगांव येथें वडिलांच्या स्मरणार्थ 'संस्कृत-बालविद्यालय ' स्वतःच्या खर्चानें स्थापिलें. आरंभीं २० मुलें आलीं. संभाषणपद्धतीनें ( direct method ) मुलांना संस्कृत कसें शिक-वावें हें दाखविण्याकरितां प्रत्यक्ष बेळगांवास जाऊन पं. मुर्डीशास्त्री यांना सूचना देऊन त्यांच्याकडून तें कार्य सुरू केलें. ही संस्था ८ महिने राहून केवळ संस्कृतभाषेकडे दुर्लक्ष असलेल्या लोकांच्या मुलेंच नाइलाजानें बंद करावी लागली.

अध्यापन—दर्शी घरीं काहीं मुलींना संभाषणपद्धतीनें संस्कृत-भाषा शिकविण्याचें कार्य चालू आहे. पत्ता–सौ. पण्डिता क्षमादेवी राव, साहित्यचन्द्रिका, ३७ न्यू मरीन लाईन्स, मुंबई.

प्रि. डॉ. कमलाबाई देशपांडे—( श्री. न. चिं. केळकर ऊर्फ तात्यासाहेब यांच्या सुविद्यकन्या ) जन्म—१८९० मिरज येथें.

शिक्षण—मॅट्रिक सन १९१७. पदवी—सन १९२० कर्वे युनि-व्हर्सिटीची जी. ए. ( बी. ए. ) प्राग येथील जर्मन युनिव्हर्सिटींत अभ्यास व पी. एच्. डी. डिग्री मिळविली. सन १९२१–२२ वार-

जाची शाळा चालविली. अनाथबालिकाश्रमाच्या आजन्म सेविका. सन १९२२ ते २९ लेडी सुपरिंटेन्डेंट, कन्याशाळा, सातारा. सन १९३१ ते ३२ श्री. ना. दा. ठाकरसी महिलाकॉलेजमध्यें संस्कृतभाषेच्या प्रोफेसर. नंतर सन १९३२ पासून कॉलेजच्या प्रिन्सिपल.

**ग्रंथ**—१ The child in Ancient India हा निबंध पी. एच्. डी. साठीं लिहिला. २ गीतदल.

**कु. चंद्राबाई श्रीनिवास कर्नाटकी**, एम्. ए. बी. टी. टी. डी. (लंडन) जन्म १९०६. **शिक्षण**— प्राथमिक दाभोळ व रत्नागिरी. नंतर चार वर्षे हिंगणें महिलाश्रम. हुजूरपागेंत इ. ५ वी पासून, मॅट्रिक १९२२. कॉलेजचें सर्व शिक्षण सर परशुरामभाऊ कॉलेज. विषय- संस्कृत व इंग्लिश, बी. ए. ला संस्कृत ऑनर्स. बी. ए. व एम्. ए. दोन्ही परीक्षांत कॉलेजमधून संस्कृतमध्यें बक्षिसें. संस्कृतची आवड आनुवंशिक, आजोबा घनपाठी दशग्रंथी ब्राह्मण असून वेदपठण व वेदान्तशास्त्राचे पंडित होते. वडील थोडे दिवस संस्कृतचे अध्यापक होते.

**संस्कृतचें अध्यापन** जवळ जवळ १० वर्षें. मुंबई युनिव्हर्सिटींत मॅट्रिकला संस्कृतची परीक्षक. १९३१-१९३५, व १९३७ (मार्च). १९२६-२७ नागीबाई कन्याशाळेंत अध्यापन व १९२९ ऑक्टोबर पासून पुढें हुजूरपागेंत.

**सौ. मालतीबाई विश्वनाथ बेडेकर** ( बाळूताई खरे ) जन्म— १९०५. शिक्षण—प्राथमिक व इंग्रजी शिक्षण इयत्ता ५ वी पर्यंत घोडनदी ( ता. शिरूर ) येथें झालें. महिलाश्रम, हिंगणें येथें मॅट्रिक-पर्यंत शिक्षण झालें. सन १९२० सालीं कर्वेयुनिव्हर्सिटीची मॅट्रिक परीक्षा पास. पदवी—कर्वे युनिव्हर्सिटीच्या सन १९२३ सालीं जी.ए.

( बी. ए. ). सन १९२८ सालीं पी. ए. (एम्. ए.). अध्यापन— १९२३ ते १९३४ पर्यंत कन्याशाळा, पुणें येथें लेडी सुपरिंटेण्डेन्ट म्हणून काम केलें, व संस्कृतभाषेचें अध्यापन केलें. तद्वत् कांहीं दिवस ठाकरसी कॉलेजमध्यें संस्कृत शिकविलें. सन १९३४ ते १९३५ सालीं बी. टी. कॉलेजांत शिक्षण. सन १९३५, ३६ हिंगणे महिला-विद्यालय येथें लेडी सुपरिंटेन्डेन्ट. सन १९३६ मध्यें सहा महिने जनरल एज्युकेशन सोसायटी, दादर, मुंबई येथें लेडी सुपरिंटेंडेंट. सन १९३८ ते १९४१ पर्यंत सोलापुरच्या 'क्रिमिनल ट्राईज सेटलमेंट' येथें लेडी सुपरिंटेंडेंट. ग्रंथ—अलंकारमंजूषा, हिंदुव्यवहारधर्मशास्त्र.

सौ. प्रमिलादेवी वराडपांडे— काव्यतीर्थ. यांचे संस्कृतचें शिक्षण नागपूर संस्कृत कॉलेजांत झालें असून ह्या बंगाल संस्कृत असोसिएशनच्या सरकारी ' काव्यतीर्थ ' (कलकत्ता) पदवीधर आहेत. शिक्षिका— नागपूर संस्कृत कॉलेज.

सौ. वनमाला भवाळकर, एम्. ए. ( श्री. ना. स. लोकूर, बी. ए., एल् एल्. बी. डिस्ट्रिक्ट ॲन्ड सेशन्स जज, पुणें यांच्या सुविद्य कन्या ) शिक्षण—प्राथमिक व हायस्कूल चें ५ इयत्तेपर्यंतचें शिक्षण व संस्कृतचें शिक्षण वडिलांच्या जवळ झालें. धारवाड हायस्कूलमधून १९२९ सालीं मॅट्रिकची परीक्षा पास. धारवाड येथील कर्नाटक कॉलेजात एफ्.वाय्. व इंटर पर्यंत शिक्षण झालें; अहमदाबाद येथील गुजराथ कॉलेजांत बी. ए. चा अभ्यास होऊन १९३३ सालीं बी. ए. परीक्षा पास; १९३७ सालीं कलकत्ता युनिव्हर्सिटीच्या एम्. ए. परीक्षेला ' एन्शन्ट इंडियन हिस्ट्री अॅन्ड कल्चर, अर्क्यालॉजी अॅण्ड न्यूमिसमॅटिक्स; ' हे विषय घेऊन सर्व युनिव्हर्सि-

टींत पहिला नंबर येऊन युनिव्हर्सिटीचें गोल्ड मेडल व २०० रुपये किंमतीचीं पुस्तकें बक्षीस मिळालीं.

**अध्यापन**— गोखले मेमोरियल स्कूल अण्ड कॉलेज कलकत्ता येथें कांहीं वर्षे संस्कृतभाषेचें अध्यापनाचें काम केलें.

**युरोपांतील संस्कृतज्ञ स्त्रिया—मृत**— डॉ. अनिबिझांट, सिस्टर निवेदिता. **विद्यमान**— डॉ. बेटी हायमान, लंडन. मॅडम मॅबोस्का, क्रॅकाऊयुनिव्हर्सिटी, पोलंड.

**संस्कृत शिक्षिका**—सौ. सुशीलाबाई कोठीवान, जी. ए. लेडी-सुपरिंटेंडेंट व संस्कृत अध्यापिका, दादीबाई देशमुख हिंदु मुलींची शाळा, नागपूर. कु. कुसुम परांजपे, जी. ए. काव्यतीर्थ. संस्कृत अध्यापिका, दादीबाई देशमुख हिंदु मुलींची शाळा व संस्कृत कॉलेज, नागपूर. सौ. शांता गोखले, जी. ए. संस्कृत अध्यापिका दा. दे. हिं. शा. नागपूर. कु. विजयाबाई घाटे, एम्. ए. बी. टी. टी. डी. (कै० डॉ. वि. स. घाटे संस्कृत प्रोफेसर, डेक्कन कॉलेज, व एल्फिस्टन कॉलेज, यांच्या सुविद्य कन्या ) हुजूरपागा पुणें. कु. यशवंतीबाई गुप्ते, बी. ए. बी. टी. हुजूरपागा पुणें.

**जगन्नाथ शंकरशेट संस्कृत स्कॉलरशिप मिळविलेल्या विद्यार्थिनी**— सन १९१८ आजगांवकर सीताबाई नारायण ( श्री. परमानंद आय्. सी. एस्. यांच्या पत्नी डॉ. सौ. सीताबाई परमानंद), रत्नागिरी हायस्कूल. सन १९२१ सुलभा पाणंदीकर, हुजूरपागा पुणें. सन १९२३ उकिडवे कमलाबाई ( म्रि. सौ. कमलाबाई टिळक ) हुजूरपागा, पुणें.

**यमुनाबाई आत्माराम दळवी संस्कृत स्कॉलरशिप मिळविलेल्या विद्यार्थिनी**—मॅट्रिक परीक्षेत संस्कृतांत उत्तम मार्क मिळविलेल्या

विद्यार्थिनीला ही स्कॉलरशिप मिळते; वार्षिक २०० रु. १ वर्षपर्यंत, सन १९०० पासून सुरू झाली.

१९०० केळकर यमुनाबाई कृष्णराव युनियन् हायस्कूल, मुंबई.
१९०४ जोशी सईबाई हुजूरपागा पुणें.
१९०५ उदास कावेरी ,,
१९०६ खरे कृष्णाबाई प्रिन्सेस हायस्कूल फॉर गर्लस् मुंबई.
१९०७ Jhirad Jerush जेकब हायस्कूल फॉर इंडियन गर्लस्, ( हुजूरपागा ) पुणें.
१९०८ वाफेकर मथुराबाई कारवार हायस्कूल.
१९०९ हर्डीकर तारीबाई न्यू इंग्लिशस्कूल पुणें.
१९१० डोंगरे ठकुबाई न्यू इंग्लिशस्कूल पुणें.
,, पुरोहित वेणुबाई हुजूरपागा, पुणें.
१९११ केळकर वेणूबाई ,, ,,
१९१२ हिवरगांवकर द्वारकाबाई बळवंत न्यू इंग्लिशस्कूल, पुणें.
१९१३ पाटणकर वेणू नू. म. वि. व भोर हायस्कूल.
१९१४ मैने दुर्गाबाई गणपतराव ट्युटोरियल हायस्कूल, मुंबई.
१९१६ धोपेश्वरकर गोदू हुजूरपागा, पुणें.
१९१७ भंडारे मालती हरिभाऊ स्टूडन्टस् लिटररी ॲण्ड सायंटिफिक सोसायटीचें गर्लस् स्कूल, मुंबई.
१९१८ आजगांवकर सिताबाई
सौ. डॉ. सिताबाई परमानंद रत्नागिरी हायस्कूल.
( श्री. परमानंद, आय्. सी. एस्. यांच्या पत्नी )

| | |
|---|---|
| १९१९ कोल्हटकर विमल * | हुजूरपागा, पुणें; |
| १९२० कोठारी तारा | ” ” |
| १९२१ पाणंदीकर सुलभा | ” ” |
| १९२२ करमरकर इरावती (सौ. कर्वे) | ” ” |
| १९२३ उकिडवे कमलाबाई ( मि. सौ. कमलाबाई टिळक ) | ” ” |
| १९२४ जोगळेकर ताराबाई | जी. एस्. हायस्कूल, जळगांव. |
| १९२५ देशपांडे सीता | हुजूरपागा, पुणें. |
| १९२६ दवे सुमदा केवलराम | चंदारामजी गर्ल्स स्कूल, मुंबई. |
| १९२७ परांजपे सुनंदा अनंत | सांगली हायस्कूल. |
| १९२८ भट मिरा हरीहर | St. Columbo H. S. for girls, Bombay. |
| १९२९ दंडवते सरस्वती श्रीधर ( नलिनी देवी घाटे ) | हुजूरपागा, पुणें. |
| १९३० नायंपल्ली इन्दुमति शंकर | St. Columbo H.S. for girls, Bombay. |
| १९३१ घाणेकर कालिंदी | ” ” ” |
| १९३२ तलयलकर विजया | ” ” ” |
| १९३३ नाडकर्णी कृष्णा नारायणराव | हुजूरपागा पुणें. |
| १९३४ सुंदकुर वत्सला विठ्ठल | St. Columbo H.S. Bombay. |
| १९३५ गुणाजी चंपा यशवंत | हुजूरपागा, पुणें. |
| ” त्रिजयकर कामिनी नारायण | S. C. H. S. Bombay. |

| | |
|---|---|
| १९३६ खरे कुमुदिनी अनंत | मॉडर्न हायस्कूल, पुणें. |
| १९३७ आपटे कृष्णाबाई , | नाशिक हायस्कूल. |
| १९३८ अंबू लक्ष्मण राजगुरु | न्यू. इंग्लिशस्कूल, सातारा. |
| १९३९ वैजयंती लळित | ह. दे. हा. स्कू. सोलापूर. |
| १९४० गुणे कुसुम यशवंत. | Islam. |
| १९४१ Danval वैदेही नारायण | Kar. |
| १९४२ आठवले नर्मदा महादेव. | S. Can. |

## मनोरंजन

वेद—करमणुकीच्या साधनापैकीं 'द्यूत' हें सामान्य लोकांत रूढ होतें. द्यूतसूक्त ऋ. १०-३४ प्रसिद्ध आहे. २ रथाची शर्यत (रथ-सग ऋ. ९-५३-२ ). ३ शिकार— सिंह जाळ्यांत पकडणें. हरणांना खड्यांत पकडणें. रानडुकर पकडण्याकरितां कुत्रे सोडणें. हत्तीला माणसाळविणें. (ऋ. ७-५५-४. ५-५२-१२. ६-६३-५. ८-९२-३)

## बुद्धिबळपरिचय

हा खेळ म्हणजे एक बुद्धीची तालीम आहे. 'परिस्थिति कशी असावी हें माणसाच्या हातीं नाहीं परंतु असलेल्या परिस्थितींतून मार्ग काढून हातीं असलेल्या साधनांनीं विजय मिळवावयाचा हें अवघड काम नेहमीं माणसाला व्यवहारांत करावें लागतें. या दृष्टीनें विचार करतां बुद्धिबळाच्या खेळानें बुद्धीचें तेज वाढून आत्मविश्वास वाढतो.

बैठ्या खेळांत बुद्धिबळ हा श्रेष्ठप्रतीचा खेळ आहे. हा खेळ खेळणाऱ्यांची नीतिमत्ता व प्रामाणिकपणा उच्चप्रतीचा असतो.

**संस्कृतग्रंथ**—'विलासमणिमञ्जरी' पं. त्रिवेंगडाचार्यकृत व चतुरंगदीपिका, तरंगिणी ( प्रो. मनमोहन घोष, कलकत्ता, यांनीं प्रकाशित केलेली ) 'बालकहित बुद्धिबल क्रीडनम्' वगैरे बुद्धिबळावर ग्रंथ आहेत. मराठी भाषांतर—'विलासमणिमंजरी' ह्या ग्रंथाचें 'बुद्धिबल क्रीडार्णव' असें पुस्तक आहे. लेखक—गणेश रंगो कुलकर्णी, हळ्दीकर, बी. ए. एल्‌एल्. बी., कोल्हापूर. किं. २ रु. ४ आ. याचे प्रकाशक—डी. एन्. मोघे, प्रोप्रायटर स्कूल ॲण्ड कॉलेज बुकस्टॉल, कोल्हापूर.

**विलासमणिमञ्जरीचा परिचय**—हा ग्रंथ दुसऱ्या बाजीरावांनीं पं. त्रिवेंगडाचार्यांच्याकडून करविला. बाजीराव म्हणतात—हे सचिवश्रेष्ठ तुम्ही सर्व कामांत फार हुशार, बुद्धिमान, मानी, माझे अत्यंत आवडते असे आहांत. माझी अशी इच्छा आहे कीं तुम्ही सर्व लोकांना हितकारक चतुरंग ( बुद्धिबळ ) या विषयावर एक नवीन ग्रंथ लिहावा, कीं त्याची सर्व ठिकाणीं प्रशंसा ( वाहवा ) होईल. विद्वानलोक व राजेलोक यांनीं त्या ग्रंथाला भूषण मानून आनंदानें मस्तकावर धारण करावा.

> त्वं वरेण्यः विमलतरमतिः सर्वकार्येषु दक्षः ।
> मानी मत्प्रीतिपात्रं ह्यसि परमनतः सर्वदेशप्रशस्त्यै ।
> ग्रंथो भाव्यो नवीनः सकलजनहितश्चातुरङ्गप्रधानः ।
> विद्वांसो राजसंघाः प्रमुदितमनसा शेखरं यं वहेयुः ॥ १ ॥

जिष्यामध्यें शिष्ट लोक राहतात अशी तिरुपति नगरी ही ज्याची जन्मभूमि आहे, आपल्या पुष्कळ दिवस आश्रित असलेला त्रिवेंगडा-

चार्य कवि हा अष्टावधानी, अनेक कला जाणणारा, आपला आवडता असा आहे तेव्हां त्याचेकडून ग्रंथ करवा.

श्रीतिर्पतिपुरी शिष्टसंसेव्या यस्य जन्मभूः ।
स इदानीमिहैवास्ते चिरमस्मानुपाश्रितः ॥ २ ॥
त्रिवेंगडाचार्यसुधीः कविर्यो ह्यष्टावधानादिकलाविलोलः ।
त्वत्प्रीतिपात्रे परमं ततस्त्वं सुसंस्कृतं कारय पद्यजालैः ॥ ३ ॥

सदाशिव प्रधानांनीं सांगितलेली बाजीरावांची भव्य कल्पनाशैली मनांत ठेवून चतुरंगविलासाचें तत्त्व जाणणारा हा त्रिवेंगडाचार्य विलासमणिमंजरी लिहीत आहे.

ततस्तद्वसुधाधीश भव्यचित्तानुसारिणी ।
सदाशिवप्रधानोपदिष्टां शैलीं विभावयन् ॥ ४ ॥
चतुरङ्गविलासस्य तत्त्वं ज्ञात्वा तनोत्यसौ ।
त्रिवेंगडाचार्यसुधीर्विलासमणिमञ्जरीम् ॥ ५ ॥

या ग्रंथांत—१ बुद्धिबळाची परिभाषा. २ डावाची मांडणी. ३ उत्तम खेळाडू. ४ डावांत विजयी होण्याचे प्रकार. ५ मोहऱ्यांचे सामर्थ्य. ६ मोहरी जिवंत करणें वगैरे विषय आहेत.

## बुद्धिबळपरिभाषा

| संस्कृत | मराठी | इंग्रजी |
|---|---|---|
| चतुरंग | बुद्धबळ | Chess |
| क्रीडाचक्र, किंवा अष्टकोटि | पट | Chess board |
| | सोंगटे | Piece chess |
| | नरद | Men |

| | | |
|---|---|---|
| राजा | राजा | King |
| प्रधान | वजीर | Queen |
| हस्ती | हत्ती | Rook |
| अश्व | घोडा | Knight |
| उष्ट्र | उंट | Bishop |
| पदाति | प्यादा-दें | Pawn |
| वेधन | शह | Check |
| बिंदुक | बुर्जि | |
| हनन, मृत्तिका | मात | Mate |
| पत्तिमृत्तिका | प्यादेमात | Check-mate |

- विशेष—

**गंजिफा-पत्ते**— संस्कृतभाषेंत 'गंजिफाखेलन' पं. गिरिधरकृत हें पुस्तक आहे, यांत गंजिफा खेळण्याची माहिती आहे, प्रकाशक— निर्णयसागर प्रेस, मुंबई याची काव्यमाला, गुच्छ १३ पृ.८.

---

## म्हणी ( न्याय )

**कंठचामीकरन्याय**—नाकांत नथ असून तिच्या शोधार्थ गांवभर हिंडणें. ( चामीकर-नथ ). २ **अंधपंगुन्याय**—एकमेकांना मदत करणें; ज्याप्रमाणें आंधळ्यानें पांगळ्याला खांद्यावर घ्यावें आणि पांगळ्यानें आंधळ्याला रस्ता सांगावा त्याप्रमाणें. ३ **अंधदर्पणन्याय**—आंधळ्याला आरशाचा काय उपयोग ! ४ **काकतालीयन्याय**—अनपेक्षित, अचानक, सहजगत्या एखादी गोष्ट घडणें. जसें ताडाच्या फांदीवर

काचळ्या बसावयाला आणि ती फांदी मोडावयाला एक गांठ पडणें, ती त्याच्या भारानें मोडली असें नाहीं. ५ कूपमंडूकन्याय—घर न सोडलेल्या व जग न पाहिलेल्या मनुष्याप्रमाणें संकुचित दृष्टि असलेला; जसें विहिरींतील बेडकाला विहीर हेंच जग वाटतें तसें. ६ क्षीरनीरन्याय—पूर्ण मिलाफ – पाणी व दूध. ७ घुणाक्षरन्याय—सहज गोष्ट घडणें. जसे—किड्यानें ( भुंग्यानें ) पोखरलेल्या भागाला अक्षराची आकृती येणें; ८ तुषकंडनन्याय—भुसा कांडणें, व्यर्थ श्रम. ९ दण्डापूपन्याय—ओघानेंच प्राप्त होणें; उदाहरण—उंदरानें काठी नेली किंवा खाल्ली, तेव्हां तिला बांधलेले अनरसे नेले किंवा खाल्ले असलेच पाहिजेत. १० दृषदिष्टिकान्याय—दगडापेक्षां वीट मऊ. ११ देहलीदीपन्याय—एका गोष्टीनें दोन कामें साधणें. जसें उंबऱ्यावर ( देहली उंबरा ) दिवा ठेवला म्हणजे दोन्ही खोल्यांत प्रकाश पडतो तसें. १२ नृपनापितन्याय—आपलें तेंच चांगलें समजण्याची माणसाची प्रवृत्ति असते; उदाहरण—' गांवांतील अतिसुंदर मूल शोधून आण ' असें राजानें न्हाव्याला सांगितलें, तेव्हां सर्व गावांत हिंडून शेवटीं आपलाच कुरूप मुलगा इतरांपेक्षां सुंदर आहे असें वाटून तोच त्यानें राजापुढें आणला. १३ पिष्टपेषणन्याय—निरर्थक उद्योग. दळलेलें पीठ पुनः दळणें. १४ स्थालीपुलाकन्याय—शितावरून भाताची परीक्षा. १५ सूचीकटाहन्याय—अगोदर लहान ( सोपें, कमी वेळ लागणारें ) काम करून नंतर मोठें काम करणें. उदाहरण—एका माणसानें लोहाराला एक कढई तयार करावयाला सांगितली व दुसऱ्यानें सुई तयार करावयाला सांगितली.

आभाणकमाला—लेखक–उमादेवी; किं. ८ आ. १ कुड्यानामपि सन्ति कर्णाः—भिंतींना सुद्धा कान असतात, Walls have ears. २ अतित्वरा कार्यनाशिका—अतिघाई कार्यनाश करणारी असते, More haste, worse speed. ३ वचने का दरिद्रता—बोलण्यांत कसलें दारिद्र्य. Civility does not cost anything. ४ संहतिर्बलसाधिका—ऐक्य हीं शक्ति होय, Unity gives strength. ५ नहि सुखं दुःखैर्विना लभ्यते—दुःखाशिवाय सुख मिळत नाहीं, No pains, No gains. ६ मौनं संमतिलक्षणम्—मौन हें संमतिचें लक्षण होय, Silence gives consent. ७ जीवनार्थंम् भुञ्जीत न तु भोजनाय जीवेत्— जगण्याकरितां खावें, खाण्याकरितां जगूं नये, Man eats to live and does not live to eat. ७ सर्वः कान्तमात्मीयं पश्यति —आपलें तेवढें चांगलें, Every one thinks his own geese swans.

मराठी म्हणींचा संस्कृत पेहराव— कै. पं. मुकुंदशास्त्री गणेश मिरजकर, संस्कृताध्यापक, नूतन मराठी विद्यालय पुणें. किंमत १ आणा— निवडक म्हणी—

१ पुत्र व्हावा ऐसा गुंडा । ज्याचा तिन्ही लोकीं झेंडा ॥

पुत्रोऽस्तु धन्यः खलु तादृशोऽत्र ।
लोकत्रये यस्य यशःपताका ॥

२ परस्वाधीन जिणें आणि पुस्तकी विद्या,
वृथा प्रस्थगता विद्या पराधीनं च जीवितम् ।

३ नळी फुंकिली सोनारें इकडून तिकडे गेलें वारें,

